मराठी तिसऱ्या इयत्तेच्या शिक्षकांचे उपयोगासाठी

मुंबई सरकारनें मंजूर केलेले पुस्तक.

# नासिक जिल्ह्याचें वर्णन.


लेखक,

दामोदर गणेश भालेराव,

हेडमास्तर सटाणे,

व

विठ्ठल खंडेराव क्षीरसागर,

हेडमास्तर. शाळा नंबर २, नासिक.



आवृत्ति ५ वी. १९२

PU

MANGA


किंमत ०५ आणे.

मराठी तिसऱ्या इयत्तेच्या शिक्षकांचे उपयोगासाठीं
मुंबईसरकारनें मंजूर केलेलें पुस्तक.

# नासिक जिल्ह्याचें वर्णन.

लेखक

दामोदर गणेश भालेराव,
हेडमास्तर, सटाणें

व

विठ्ठल खंडेराव क्षीरसागर,
हेडमास्तर शाळा नंबर २, नासिक.

सुधारलेली आवृत्ति ५ वी.

५००० प्रती.

सन १९२४.

प्रकाशक,
मंगळदास आणि सन्स, सुरत.

किंमत ५ आणे.

# प्रस्तावना.

तिसऱ्या इयत्तेकरितां ठरविलेल्या भूगोलविषयाच्या माहितीसाठीं हें जिल्ह्याचें वर्णन तयार केलें आहे.

हें पुस्तक लिहिते वेळीं गॅझिटियर, स्टॅटिस्टिकळ् ॲटलास, सरकारी रिपोर्ट व जिल्ह्यांतील कांहीं शिक्षकांकडून आलेली माहिती ह्यांचा आम्हांस फार उपयोग झाला.

ह्या जिल्ह्याच्या वर्णनांत, दिलेल्या माहितीचा क्रमशः-शिक्षकांच्या सूचनेंत-दाखविलेला संबंध, जिल्ह्याच्या महत्त्वाचें केलेलें वर्णन, प्रसिद्ध स्थळांचें वर्गीकरण व घातलेले कांहीं नकाशे हें सर्व विशेष आहे; असें दिसून येईल.

पुस्तककर्ते,

तारीख,
२६-५-१६

**दामोदर गणेश भालेराव,**
हेडमास्तर, सटाणें.
**विठ्ठल खंडेराव क्षीरसागर,**
हेडमास्तर शाळा नंबर २, नासिक.

# शिक्षकांस सूचना.

भूगोलविषयक माहिती प्रत्यक्ष वस्तुज्ञानानें व परस्परसंबंध राखून मुलांस कशी करून देतां येईल, ह्याचें थोडेंसें दिग्दर्शन पुढील विवेचनावरून शिक्षकांस होईल.

जिल्ह्याचा नकाशा मुलांसमोर ठेवून आपण ज्या तालुक्यांत राहतों, तो तालुका व त्या भोंवतालचे दुसरे सर्व तालुके मिळून दिसणारी आकृति, हा आपला 'जिल्हा' होय, असें त्यांस समजावून द्यावें.

१ पूर्वी शिकविलेल्या दिशांची माहिती मुलांस विचारून जिल्ह्याच्या मर्यादा त्यांजकडून काढून घ्याव्या. जिल्ह्याची हद्द दाखवून तीवरील डोंगर, नदी ह्यांवरून स्वाभाविक हद्द व तसें कांहीं नसल्यास—गांवच्या शिवारांवरून—बनविलेल्या कृत्रिम हद्दीची कल्पना मुलांस करून द्यावी.

२ मुलांस नकाशापासून थोडें दूर उभें करून जिल्ह्याचा आकार साधारणपणें कशासारखा दिसतो, तें ठरवावें. स्केलाच्या प्रमाणावरून लांबी–रुंदी मोजून दाखवावी आणि आपल्या तालुक्याच्या क्षेत्रफळाच्या मानानें जिल्हा कितीपट मोठा आहे, हें ठरवून त्यावरून त्या जिल्ह्याच्या क्षेत्रफळाचा अंदाज काढून घ्यावा.

३ नकाशावरील खुणांची माहिती देऊन डोंगराळ प्रदेश कोणता, व मुख्य पर्वत, त्यांचे फांटे आणि नद्यांचे प्रवाह, हे कोणत्या दिशेकडे गेलेले आहेत, हें दाखवून उंच-सखल प्रदेशांची स्थूलमानानें माहिती करून द्यावी. नंतर त्या चढ-उतारांतील फेरबदल कोठें कोठें व कोणत्या कारणांनीं झालेले आहेत, हें काढून घ्यावें. [ ही माहिती देतांना शिक्षकानें रिलीफ-मॅपचा ( रेती, माती किंवा लुकण ह्यांनीं बनविलेल्या उठावाच्या नकाशाचा ) अवश्य उपयोग करावा. कागदावरील नकाशापेक्षां ह्या उठावाच्या नकाशानें मुलांची समजूत सहज करून देतां येईल. ] डोंगरी किल्ले व डोंगरावरील प्रसिद्ध स्थळें ह्यांचीं नांवें व स्वरूप सांगून त्यांचें पूर्वींचें व हल्लींचें महत्त्व काय तें समजवून सांगावें.

४ डोंगरांच्या रांगांनीं खोरीं कशीं बनतात, मुख्य नदीचा प्रवाह ह्या रांगांशीं समांतर असून तिला मिळणाऱ्या लहान नद्यांचे प्रवाह उतरणीवरून वहात येऊन तीस कसे मिळतात, हें नजरेस आणावें. [ जवळपास कोठें डोंगर, टेंकडी, नदीचा उगम, संगम इ० असल्यास तेथें मुलांस नेऊन प्रत्यक्ष दाखवावें. पाऊस पडत असतां वाहणाऱ्या प्रवाहांवरून व सांचलेल्या डबक्यांवरून उंच—सखल प्रदेश, नदी, तलाव, उगम, संगम, धबधबा, बेट इ० किती तरी संज्ञांचे अर्थ सर्वत्र व सहज समजवून देतां येतील. ] 'गांवें हीं बहुधा पाण्याच्या सोयीनें वसलेलीं असतात' असें नजरेस आणावें.

नद्यांचें पाणी अडवून त्याचा शेतीच्या कामाकडे कसा उपयोग करून घेतात, हें शक्य असल्यास प्रत्यक्ष-पाट, बंधारे वगैरे-दाखवून समजवून द्यावें.

५ निरनिराळ्या ऋतूंत आपलेकडील हवा कशी असते, विवक्षित स्थळीं उन्हाळा व हिंवाळा कमजास्त कां होतो व पावसाळ्यांत पाऊस कोठें किती पडतो हें आंकड्यांवरून दाखवावें. [ वरील माहिती देतांना शक्य असल्यास उष्णता व पाऊस मोजण्याच्या साधनांचा प्रत्यक्ष उपयोग करावा. ] हवामानासंबंधानें उंच—सखल प्रदेशांत कोणते फरक होतात, घरें कोठें कौलारू, कोठें धाब्याचीं कां असावीं, ह्या गोष्टींचें ज्ञान मुलांस करून देणें अवश्य आहे. ( ह्या बाबतींत आपण व मुलांनीं केलेल्या प्रवासांतील अनुभव व गांवची स्थिति ह्यांच्या तुलनेचा उपयोग करावा. ) रोगराईची साधारण माहिती द्यावी.

६ आपल्या गांवीं कोणत्या जमिनींत कोणतें व किती पीक येतें, अमुक जमिनींत अमुक पीक कां येत नाहीं; बरड व काळ्या जमिनी कशा बनतात, हें समजावून सांगावें. उन्हाळ्यांत होणारीं खरिपाचीं पिकें व हिंवाळ्यांत होणारीं रब्बीचीं पिकें विचारावीं आणि त्यांवरून जमिनींची सुपीकता व हवामान ह्यांचा पिकांशीं संबंध कसा आहे, हें मुलांच्या लक्षांत आणून द्यावें. ( मुलांस शेतांतून फिरावयास नेऊन जमिनीचें स्वरूप, नद्यांनीं वाहून आणलेला गाळ, भिन्न प्रकारच्या

जमिनींतील भिन्न पिकें इ० प्रकार समजवून दिल्यास फारच उपयोगाचें होईल. ) जळाऊ व इमारती लाकडें, मध, डिंक इ० वस्तूंवरून जंगलांतील उत्पन्नाची माहिती करून द्यावी.

७ गांवांत राहाणाऱ्या निरनिराळ्या धर्मांच्या व जातींच्या लोकांवरून लोकांची राहणी, भाषा, धंदे, रीतिरिवाज, संवयी व स्वभाव ह्यांबद्दलची माहिती द्यावी. निरनिराळ्या हवामानांत राहणारे कोंकणी व खानदेशी लोक कधीं कधीं आपल्या गांवीं येतात, ते दाखवून हवामान व परिस्थिति ह्यांचा लोकांवर परिणाम कसा होतो, हें नजरेस आणावें. पांढरपेशे लोक व भिल्ल, कोळी वगैरे हलक्या दर्जाचे लोक ह्यांची तुलना करून शिक्षण व स्वच्छता इ० गुणांचें महत्त्व मुलांच्या मनांत ठसवावें.

८ गांवांत अथवा आसपास कांहीं उद्योगधंदे व कारखाने चालत असतील, ते मुलांस अवश्य दाखवावे. आणि उत्पन्नाचा व उद्योगधंद्यांचा संबंध कसा आहे, कारखाने चालण्यास कोणती परिस्थिति अनुकूल असावी लागते हें त्यांच्या नजरेस आणावें. मुख्यत्वें शेतीच्या सोईनें गांवें व व्यापाराच्या सोईनें शहरें बनतात, असें दाखवावें.

९ जमिनीचें उत्पन्न व कारागिरीचे पदार्थ ह्यांच्या खरेदीविक्रीकरितां बाजार व पेठा पहाव्या लागतात व त्याकरितां चांगले रस्ते तयार केलेले असतात. ही माहिती करून देण्याकरितां आपल्या गांवीं अथवा आसपास भरणारा बाजार दाखवून त्यांतील ऋतुमानाप्रमाणें विक्रीस येणारे जिन्नस व निरनिराळ्या पेठांतून आलेला माल ह्यांवरून पेठांची व आयात–निर्यात मालाची, तशीच रहदारीच्या रस्त्यांची माहिती क्रमानें करून द्यावी.

१० गांवांत असणारे सरकारी कामगार व आपल्या गांवीं प्रसंगवशात् येणारे अंमलदार ह्यांवरून, तसेंच गांवांत उत्पन्न झालेल्या विशेष प्रसंगांवरून निरनिराळ्या खात्यांतील अधिकाऱ्यांची व त्यांच्या कामाकाजांची माहिती मुलांस करून द्यावी. धर्मशाळा, दवाखाने, शाळा, पोस्टें इ० लोकोपयोगी कामांवरून इतर खातीं व लोकलबोर्ड, म्युनिसिपल् बोर्ड इ० यांविषयीं माहिती सांगावी.

११ शेवटीं आपण ज्या जिल्ह्यांत राहतों, त्यांतील कोणतीं स्थळें कशाकरितां प्रसिद्ध आहेत हें सांगावें, त्यांचीं चित्रें दाखवावीं. साधल्यास—यात्रा वगैरे प्रसंगानें—प्रत्यक्ष दाखवून त्यांचें महत्व नजरेस आणावें आणि कांहीं स्थळांची ऐतिहासिक माहिती मुलांस सांगावी म्हणजे त्यांस आपल्या जिल्ह्याविषयीं आदर वाटेल.

अशा प्रकारें प्रत्यक्ष—वस्तुदर्शनानें—मुलांस माहिती दिली असतां, हा विषय मनोरंजक व उपयुक्त वाटेल आणि ह्यांत पाठ करण्यासारखा भाग फारच थोडा आहे, असेंही दिसून येईल. सर्व गोष्टींचा परस्परसंबंध व एकीचा दुसरीवर होणारा परिणाम ह्या गोष्टी मुलांच्या लक्षांत आल्या म्हणजे त्यांना अवलोकन व विचार करण्याची संवय लागून त्यांची जिज्ञसा जागृत होईल.

१२ नकाशांचे आराखडे मुलांजवळ देऊन ते त्यांजकडून दिलेल्या माहितीच्या क्रमानें भरून घेणें, हें भूगोलविषयक ज्ञान देण्याचें उत्तम साधन होय.

**भूगोल—शिक्षणाचीं साधनें:—**

हा विषय शिकवितांना निरनिराळया प्रकारचे कागदावरील नकाशे, उठावाचे नकाशे, डोंगर वगैरेंच्या प्रतिमा, नाना प्रकारच्या वस्तु, कारागिरीचे पदार्थ, प्रसिद्ध स्थळांचे फोटो, चित्रें इ० साधनांचा उपयोग शिक्षकांनीं अवश्य करावा.

मे० काव्हर्टन साहेबांच्या सूचना, शालापत्रकांतील भूगोलासंबंधीं लेख व भूवर्णनाचीं पुस्तकें ह्यांतील माहिती शिक्षकांनीं अगोदर वाचावीं, व लागू गोष्टींची निवड करून तिचा वेळींवेळीं उपयोग करावा.

वरील सूचनांवरून व पुढें दिलेल्या जिल्ह्याच्या वर्णनावरून भूगोलविषयाची पूर्वींची कल्पना बदलली आहे, हें सहज लक्षांत येईल. **तरीपण ही सर्व माहिती मुलांकरितां नसून मुख्यत्वें शिक्षकांकरितां आहे, हें लक्षांत असावें.**

---

# नासिक जिल्ह्याचें वर्णन.

मुंबई इलाख्यांतील मराठी भाषा बोलणाऱ्या जिल्ह्यां-पैकीं नासिक जिल्हा हा एक आहे, तो मुंबई इलाख्याच्या चार भागांपैकीं मध्य भागांत आहे. ह्या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण नासिक शहर हें होय.

## १ मर्यादा.

उत्तरेस पश्चिम खानदेश जिल्हा, ईशान्येस पूर्व खानदेश जिल्हा, पूर्वेस निजामचें राज्य, आग्नेयीस अहमदनगर जिल्हा, दक्षिणेस अहमदनगर जिल्हा, नैर्ऋत्येस ठाणें जिल्हा, पश्चिमेस ठाणें जिल्हा व धरमपूरचें संस्थान, वायव्येस सुरगाणें व डांग हीं संस्थानें आहेत.

[ ह्या जिल्ह्याची पश्चिम, उत्तर, व थोडीशी दक्षिण ह्या हद्दी डोंगरांच्या रांगांनीं बनलेल्या म्हणजे स्वाभाविक आहेत, व बाकीच्या हद्दी राज्यव्यवस्थेच्या सोयीनें मुद्दाम बनविलेल्या आहेत. ]

टीप—ह्या जिल्ह्यांतील ' चांदवड तालुका ' हा, जिल्ह्याचें मध्यभागीं आहे म्हणजे त्यास इतर कोणत्याही जिल्ह्याची हद्द लागलेली नाहीं.

## २ आकृति व क्षेत्रफळ.

नासिक जिल्ह्याचा आकार स्थूलमानानें तिरप्या चौकोना-सारखा ( विषमभुजचौकोन ) आहे.

---

१ कांहीं गांवें मिळून तालुका होतो. कांहीं तालुके मिळून जिल्हा होतो.

२ कांहीं जिल्हे मिळून भाग होतो. मुंबई इलाख्याचे १ सिंध, २ उत्तर-भाग, ३ मध्यभाग आणि ४ दक्षिणभाग, असे चार भाग केलेले आहेत.

ह्या जिल्ह्याची पूर्वपश्चिम लांबी सुमारें १३० मैल आहे व दक्षिणोत्तर रुंदी सुमारें १०२ मैल आहे.

[ ह्या जिल्ह्याची लांबी, रुंदीच्या सुमारें सव्वापट आहे. ]

क्षेत्रफळ सुमारें ५,८५६ चौरस मैल आहे.

---

ह्या जिल्ह्यांत १२ तालुके आहेत.—**कळवण, बागलाण ( सटाणें ), मालेगांव, नांदगांव, चांदवड, दिंडोरी, पेठ, नासिक, निफाड, येवलें, सिन्नर व इगतपुरी.**

---

## ३ उंच—सखलपणा.

जिल्ह्याचा पश्चिमभाग डोंगराळ असल्यानें उंच आहे आणि पूर्वभाग सखल आहे, हें नद्यांच्या प्रवाहांवरून दिसून येईल. पश्चिमभागांतून सह्याद्रीची ओळ दक्षिणोत्तर गेली असल्यानें तिच्या पश्चिमेकडील पेठ तालुक्याचा उतार, पश्चिमेकडे होत गेलेला आहे व बाकीच्या भागाचा उतार, सामान्यतः पूर्वेकडेस होत गेलेला आहे.

सह्याद्रि व त्या लगतचे फांटे ह्यांमुळें हिल्ह्याचा पश्चिम भाग डोंगराळ व पूर्वभाग सपाट झालेला आहे.

[ पेठ तालुका सर्वांत जास्त डोंगराळ आहे व निफाड तालुका सर्वांत जास्त सपाट असा आहे. ]

**टीप**—पेठ तालुका व सह्याद्रीचे पूर्व उतरणीवरील भाग ह्यांस 'कोंकण' व इतर भागास 'देश'[1] असें सामान्यतः म्हणतात.

जिल्ह्याच्या पृष्ठभागाची सरासरी उंची समुद्रसपाटीपासून सुमारें १६५० फूट आहे. सर्वांत पेठ तालुक्याची उंची कमी ( १३०० फूट ) आहे.

---

१ कोंकणांतील लोक ह्यास 'घाट' असेंही म्हणतात.

[ सह्याद्रीचे पश्चिमेस समुद्र अगदीं जवळ आहे म्हणून पश्चिम भाग फार उतरता होत गेल्यानें पेठ तालुक्याची उंची कमी झाली आहे; पण पूर्वेस समुद्र फार दूर असल्यानें तो भाग थोड्या प्रमाणानें उतरता होत गेला आहे, म्हणून ह्या भागाची उंची पेठ तालुक्यापेक्षां जास्त आहे. ]

## पर्वत[1] व डोंगर[1].

या जिल्ह्यांतील मुख्य पर्वत **सह्याद्रि**, हा जिल्ह्याच्या पश्चिम भागांत असून दक्षिणोत्तर गेला आहे. ह्याची ह्या जिल्ह्यांतील लांबी सुमारें १३० मैल व रुंदी १५ मैल आहे. सरासरी उंची ३,५००. फूट आहे. ह्याचें सर्वांत उंच शिखर **कळसूबाई**, हें ह्या जिल्ह्यांतील इगतपुरी तालुक्याचे दक्षिणेस असून त्याची उंची ५,४५०. † फूट आहे.

[ दक्षिण हिंदुस्तानांत हा पर्वत मुख्य असून ह्याचा उत्तरेकडील थोडासा भाग ह्या जिल्ह्यांत आलेला आहे. ह्यावर पाऊस सुमारें २२५ इंचांवर पडत असल्यानें पाण्याचा बहुतेक सर्व पुरवठा ह्यापासून होतो. ह्यांतून निघालेली मोठी व प्रसिद्ध नदी **गोदावरी** ह्या जिल्ह्यांत उगम पावते. इमारती लाकडें, जंगली पदार्थ ह्यांचें उत्पन्न ह्यांत पुष्कळ होतें. वाघ, लांडगे, इ० हिंस्र पशुही अनेक आहेत. ]

ह्या जिल्ह्यांत सह्याद्रीपासून डोंगरांच्या कित्येक रांगा पश्चिमेकडून पूर्वेकडे गेलेल्या आहेत, म्हणून त्यांस " सह्याद्रीचे फांटे "

---

१ मोठ्या टेंकड्यांस ' डोंगर ' म्हणतात. डोंगर उंच व लांब असल्यास त्यांस ' पर्वत ' असें म्हणतात.

† असे आंकडे हे समुद्रसपाटीपासून उंची दाखवितात.

असें म्हणतात. डोंगराचीं नावें त्यांतील मुख्य शिखरांवरून पडलेलीं आहेत.

१ साल्हेरमुल्हेरचे डोंगर—ह्यांची ओळ उत्तर भागांतील बागलाण व मालेगांव ह्या तालुक्यांतून पूर्वेकडे गेली आहे. ह्या ओळींत साल्हेर ( ५,२५३. फूट ), मुल्हेर ( ४,३२०. ) गाळणें ( २,३१६. ) हीं शिखरें असून त्यांवर डोंगरी किल्ले आहेत.

२ चांद्वडचे डोंगर—ही ओळ ह्या जिल्ह्याचे मध्यभागांतील दिंडोरी व चांद्वड ह्या तालुक्यांचे उत्तर हद्दीवरून सरळ पुढें जाऊन पुढें मनमाडजवळ दक्षिणेस वळते; व पुनः पूर्वेस वळून नांद्गांव व येवलें ह्या तालुक्यांचे मधून पूर्व खानदेशांत गेली आहे. ह्या ओळींत सप्तशृंगचा डोंगर ( ४,६५९. ) घोडपचा किल्ला ( ४,७६१. ) इंद्राईचा किल्ला ( ४,५२६. ) चांद्वडचा किल्ला ( ३,९९४. ) अणकईचा किल्ला ( ३,१८२. ) हीं ठिकाणें आहेत.

३ औंढ्यापट्ट्यांचे डोंगर—ही ओळ ह्या जिल्ह्याचे दाक्षिणभागांतील इगतपुरी व सिन्नर ह्या तालुक्यांचे दक्षिण हद्दीवरून गेली आहे. ह्या ओळीचा आरंभ कळसूबाईच्या डोंगरापासून होतो. ह्या ओळींत कळसूबाई हें उंच शिखर

---

१ साल्हेर हा किल्ला गायकवाड सरकारच्या ताब्यांत आहे.

२ सभोंवतीं तट व खंदक तयार करून बंदोबस्ताची व लढाईच्या सोयीची बनविलेली जागा तीस ' किल्ला ' म्हणतात. हा डोंगरावर असल्यास ' डोंगरीकिल्ला ' व जमिनीवर असल्यास ' भुईकोटकिल्ला ' म्हणतात.

३ खानदेशांत ह्या ओळीस ' अजिंठ्याचे डोंगर ' म्हणतात.

४ पट्ट्याचा इतिहासप्रसिद्ध किल्ला नगर जिल्ह्यांत आहे.

( ५,४५०. ) आणि बिटनगड, आवंढा, प्रतापगड व सोनगड हे किल्ले आहेत.

ह्यांशिवाय दुसऱ्या कित्येक लहान लहान ओळी सह्याद्रीपासून व वरील तिन्ही ओळींपासून निघून जिल्ह्यांत पसरल्या आहेत; त्यांतील कांहीं येणें प्रमाणें:—

१ **रामशेजचे डोंगर**—दिंडोरी तालुक्याचे दक्षिणेस आहेत; ह्यांत रामशेजचा किल्ला ( ३,२७३. ) आहे.

२ **अंजनेरीचे डोंगर**—नासिक तालुक्याचे दक्षिणेस आहेत. ह्यांत अंजनेरीचा किल्ला ( ४,२९२. ) आहे.

रामशेजच्या ओळींत म्हसरूळचीं लेणीं व अंजनेरीचे ओळींत पांडवलेणीं हीं जैन लोकांचीं असून पाहण्यासारखीं आहेत. )

३ **चांचेरचे डोंगर**—हे डोंगर कळवण व बागलाण ह्या तालुक्यांचे हद्दीवर असून त्यांवर चाचेरचा किल्ला आहे.

**खोरीं**—मुख्य पर्वत सह्याद्रि हा दक्षिणोत्तर असून त्याचे फांटे पूर्वपश्चिम गेलेले आहेत. त्यांतील मुख्य तीन ओळींच्या योगानें पूर्वपश्चिम अशीं दोन खोरीं बनलीं आहेत. त्यांचीं नांवें, त्यांतून वाहणाऱ्या मुख्य दोन नद्यांच्या नांवांवरून, देतां येतील.

१ साल्हेर मुल्हेरचे डोंगर व चांदवडचे डोंगर ह्यामधलें तें, **गिरणेचें खोरें**. ह्या रांगा जवळ जवळ असल्यानें खोरें अरुंद व उंच बनलें आहे. ह्यांत ४ तालुके येतात.

२ चांदवडचे डोंगर व औंढ्यापट्ट्याचे डोंगर ह्यांमधलें तें, **गोदावरीचें खोरें**. ह्या रांगा दूरदूर असल्यानें खोरें रुंद व खोल बनलें आहे. ह्यांत ७ तालुके येतात.

---

१ डोंगरांत देवादिकांच्या मूर्ति कोरलेल्या असतात, त्यांस 'लेणीं' म्हणतात.

२ दोन डोंगरांच्या ओळींमधील सखल व रुंद प्रदेशास 'खोरें' म्हणतात

[ गिरणेच्या खोऱ्यापेक्षां गोदावरीचें खोरें सुमारें १०० फूट खालीं—समुद्रसपाटीपासून कमी उंच—आहे. ]

" पेठ तालुका हा दमणगंगा व पार ह्या नद्यांच्या खोऱ्यांत गणला जातो. "

---

## ५ नद्यां.

मुख्य नद्या सह्याद्रींत उगम पावून पश्चिमेकडून पूर्वेकडे वहात गेलेल्या आहेत.

१ **गिरणानदी**—ही कळवण तालुक्यांत सिंद गांवाजवळ केमचे[२] डोंगरांत उगम पावून बहुतेक सरळ अशी पूर्वेकडे वहात जाऊन पूर्वखानदेशांत गेली आहे. ही नदी ह्या जिल्ह्यांत १२५ मैल लांब आहे.

हिला उत्तरेकडून आरम व मोसम आणि दक्षिणेकडून परसूल पांझण व मन्याड ह्या मोठ्या नद्या मिळतात. हिचे कांठीं अमोणें, कळवण, लोहणेर, ठेंगोडें, दाभाडी, पाटणें व चंदनपुरी हीं मोठीं गांवें आहेत.

( अ ) **मोसम**—ही साल्हेरचे डोंगरांत उगम पावून चंदनपुरीजवळ गिरणेस मिळते. हिचे कांठीं मुल्हेर, जायखेडें, नामपूर, खाकुरडी व मालेगांव हीं मोठीं गांवें आहेत.

२ **गोदावरी नदी**—ही नासिक तालुक्यांत त्र्यंबकेश्वराजवळ सह्याद्रींतील ब्रह्मगिरीचे डोंगरांत उगम पावून निफाड तालुक्यांतून नगर जिल्ह्यांत गेली आहे. हिला उत्तरेकडून

---

१ उतरत्या प्रदेशाकडे वहात जाणारा पाण्याचा मोठा प्रवाह, त्यास ' नदी ' म्हणतात.

२ हे डोंगर कळवण, दिंडोरी व सुरगाणें ह्यांचे हद्दीवर आहेत.

णगंगा, कादवा, अगस्ति, नारदी व दक्षिणेकडून दारणा व वनदी ह्या मोठ्या नद्या मिळतात.

हिचे कांठीं त्र्यंबक, गंगापूर, नासिक, पंचवटी, ओढें, चांदोरी, ायखेडें, कोठुरें, नांदूरमध्यमेश्वर हीं मोठीं गांवें आहेत.

[ दक्षिण हिंदुस्तानांत प्रसिद्ध असलेल्या मोठ्या नद्यांपैकीं ी एक आहे; पण हिचा फारच थोडा व उगमाकडील भाग ा जिल्ह्यांत असल्यामुळें विशेषसा उपयोग होत नाहीं. ह्या जेल्ह्यांत हिची लांबी सुमारें ७५ मैल आहे )

हिंदू लोकांनीं पवित्र मानलेल्या नद्यांत हिची गणना होते, हणून हिला 'गंगा' असेंही म्हणतात. हिचीं वर्णनें पुराणांतरीं ाढळतात. दर बारा वर्षांनीं सिंहस्थांत[1] हिचे कांठीं तीर्थ-यात्रे- करितां हिंदुलोक येत असतात. नासिक, त्र्यंबक येथें विशेष ात्रा भरत असते. ह्या नदीचे कांठीं प्रत्येक गांवीं घाट व वळें आहेत आणि नासिक, त्र्यंबक एथें हिचे पात्रांत कुंडें ांधलेलीं आहेत.

**धबधबा**[2]—गंगापूर ( तालुका नासिक ) येथें गोदावरीस बधबा आहे; त्याची उंची सरासरी ३२ फूट आहे. ह्यास दुधस्थळी' असें म्हणतात.

( अ ) **कादवा**—ही दिंडोरी तालुक्यांत केमचे डोंगरां- तून निघून आग्नेयीकडे वहात जाऊन नांदूरमध्यमेश्वराजवळ ोदावरीस मिळते.

हिला उत्तरेकडून पाराशरी व विनता ह्या नद्या मिळतात. हिचे कांठीं पालखेड ( ता० दिंडोरी ) व निफाड हीं मोठीं गांवें आहेत.

---

१ सिंह राशींत गुरू आला म्हणजे सिंहस्थ सुरू होतो.

२ उंच ठिकाणावरून पाणी खालीं पडतें त्यास 'धबधबा' म्हणतात.

[ हिचें पाणी बचनागामुळें[1] अपायकारक आहे, असें समजतात. ]

**( ब ) दारणा**—ही इगतपुरी तालुक्यांत भावली गांवा-जवळ कळसूबाईचे डोंगरांत धनुष तीर्थांतून उगम पावून ईशान्येकडे वहात जाऊन दारणासांगवीजवळ गोदावरीस मिळते.

हिचे कांठीं घोटी व भगूर हीं मोठीं गांवें आहेत.

**३ दमणगंगा**—ही पेठ तालुक्याच्या करंजाळी जवळच्या डोंगरांत उगम पावून पश्चिम हद्दीवरून ठाणें जिल्ह्यांत गेली आहे.

[ ह्या जिल्ह्यांतील सर्व नद्यांचे उगम ह्या जिल्ह्यांतच झालेले आहेत. दुसऱ्या जिल्ह्यांत उगम पावलेली एकही नदी ह्या जिल्ह्यांत आलेली नाहीं.]

---

## ( अ ) बंधारे व कालवे.

ह्या जिल्ह्यांतील बहुतेक नद्यांना बंधारे बांधून तलाव केलेले आहेत व त्यांपासून कालवे काढून त्यांचा शेतीचे कामास उपयोग करून घेण्यांत येत आहे. कच्चे बंधारे व लहान लहान पाट तर पुष्कळच आहेत. ( बंधाऱ्यांनीं नद्यांचें पाणी अडविलें जातें व तें कालव्यांनीं शेतांस देतां येतें. )

**१ दारणेचा तलाव**—इगतपुरी तालुक्यांत नांदगावांजवळ दारणा नदीस बंधारा बांधून तलाव तयार केला आहे. त्या बंधाऱ्याची लांबी सुमारें १ मैल असून उंची ७५ फूट आहे. ह्याचें पाणी नदींत बेतानें सोडून त्या पाण्याचा पुरवठा नांदूर-मध्यमेश्वर येथील तलावास करण्यांत येतो.

---

1 एक विषारी वनस्पति आहे.

**२ नांदुरमध्यमेश्वरचा तलाव**—कादवा व गोदावरी ह्या नद्यांचे संगमाखालीं बंधारा बांधून तलाव केलेला आहे. ह्याचे उजवेकडील कालवा, सिन्नर तालुक्यांतून नगर जिल्ह्यांत गेलेला आहे आणि डावेकडील कालवा निफाड व येवलें ह्या तालुक्यांचे हद्दीवरून नगर जिल्ह्यांत गेला आहे.

[ ह्या तलावाच्या पाण्याचा तुंबारा बंधाऱ्यापासून सुमारें १५ मैल लांब असतो; तरी ह्या पाण्याचा उपयोग ह्या जिल्ह्यांत फारच थोडा होत असून तो विशेषतः नगर जिल्ह्यास होत आहे. ]

**३ चणकापूरचा तलाव**—कळवण तालुक्यांत चणकापुराजवळ गिरणा व तांबडी ह्या दोन नद्या अडवून तलाव केलेला आहे. ह्या बंधाऱ्याची उंची ९२ फुट व लांबी सुमारें ३ फर्लांग आहे. ह्यांतील पाण्याचा पुरवठा गिरणेपासून काढलेल्या सर्व कालव्यांस होतो. बेज, लोहोणेर. दाभाडी, पाटणें, वगैरे ठिकाणीं गिरणेस बंधारे बांधून पाट काढलेले आहेत.

**४ वाघाडचा तलाव**—दिंडोरी तालुक्यांत वाघाडजवळ कोलवण नदीस बंधारा बांधून तलाव केलेला आहे, त्यापासून पाण्याचा पुरवठा पालखेड येथील बंधाऱ्यास होतो.

ह्यांशिवाय मालेगांव तालुक्यांत परसूल नदीस व येवलें तालुक्यांत खिर्डिसाठ्याजवळ नारदी नदीस बंधारे बांधून तलाव केलेले आहेत.

मोसम, पांझण, बाणगंगा व देवनदी ह्या नद्यांस अनेक बंधारे असून त्यांचे पासून लहान लहान पाट काढले आहेत; त्यांचा शेतीच्या कामाकडे उपयोग होत आहे.

त्र्यंबक, पेठ, म्हसरूळ वगैरे ठिकाणीं कांहीं तळीं आहेत, त्यांचा शेतीशिवाय इतर कामीं उपयोग होतो.

## ६ हवामान व पाऊस.

ह्या जिल्ह्याच्या एका बाजूस उंच पर्वत असून त्या पलीकडे जवळच सुमारें ४० मैलांवर समुद्र आहे व दुसरे बाजूस अफाट जमिनीचा भाग आहे. ह्यामुळें हवामानासंबंधानें ह्या जिल्ह्याचे तीन भाग झाले आहेत.

१ **पश्चिमभाग** ( डांगी भाग )—ह्यांत पेठ, इगतपुरी हे तालुके आणि बागलाण, कळवण, दिंडोरी व नासिक ह्या तालुक्यांचे पश्चिमेकडील भाग हे येतात. ( जिल्ह्याचा सु० ·४२ भाग. )

हा भाग उंचवट्याचा असल्यानें येथील हवा थंड असते, पाऊस फार पडतो त्यामुळें ती सर्द असते. हिंवाळ्यांतील हवा रोगट असून चार महिने हिवतापाची सांथ चालू असते. ( ह्या सांथीस तिकडील लोक 'शाळी' असें म्हणतात. ) अंगास झोंबणारे वारे वाहतात. ( हे वारे वाहूं लागले म्हणजे तिकडील लोक 'खार सुटली' असें म्हणतात. ) इकडील पाणीदेखील रोग—कारक असतें. उन्हाळ्यांतील हवा मात्र सुखकारक असते. ह्या भागांत इगतपुरी, अंजनेरी व सप्तशृंग हीं थंड हवेचीं ठिकाणें आहेत. ' इगतपुरी येथें उन्हाळ्यांत साहेब लोक हवा पालटण्यास जात असतात. ' ह्या भागांतील हवेचें उष्णतामान सरासरी ७०° ते ९५° असतें.

२ **मध्यभाग**—ह्यांत बागलाण, कळवण, दिंडोरी व नासिक ह्या तालुक्यांचे पूर्वभाग आणि चांदवड, निफाड व सिन्नर ह्या तालुक्यांचे पश्चिम भाग हे येतात. ( जिल्ह्याचा सुमारें ·२७ भाग. )

हा भाग फारसा उंचसखल नसल्यानें हवा समशीतोष्ण,

---

१ बर्फाचें उष्णतामान ३२° व वाफेचें उष्णतामान २१२° असतें ह्या मानावरून हवेच्या शीतोष्णतेचें मान ओळखावें.




श्रीकरुणेश प्रिंटिंग प्रेस, मुंबई नं. ४

 

निरोगी व शुद्ध अशी असते. ह्या भागांत देवळाली, नासिक हीं उत्तम हवेचीं ठिकाणें आहेत. श्रीमंत लोक आजारी असतां हवा पालटण्याकरितां येथें येऊन राहतात. ह्या भागांतील हवेचें उष्णतामान सरासरी ५५° ते १०२° असतें.

३ **पूर्वभाग** (देशी भाग)—ह्यांत चांदवड, निफाड व सिन्नर ह्या तालुक्यांचे पूर्वभाग आणि मालेगांव, नांदगांव व येवलें हे तालुके येतात. ( जि० सु० ३२ भाग. )

हा भाग सखल असल्यानें हवा उन्हाळ्यांत विशेष उष्ण व हिंवाळ्यांत विशेष थंड अशी असते. ह्या प्रदेशाचें हवामान एकंदरींत चांगलें असतें. ह्या भागांत मनमाड व अणकई हीं चांगल्या हवेचीं ठिकाणें आहेत. ह्या भागांतील हवेचें उष्णतामान सरासरी ५०° ते ११०° असतें.

( ह्या जिल्ह्यांतील उष्णतामानांचें अंतर पश्चिमेकडून पूर्वेकडेस क्रमानें वाढत गेलें आहे. )

# ( अ ) पाऊस.

नैर्ऋत्येकडील वारे आरबी समुद्रावरून येत असतां ते ढगांस वाहून आणतात. त्यांस प्रथम ह्या जिल्ह्यांतील सह्याद्रीचा अडथळा होतो, ह्मणून पश्चिम भागांत पाऊस जास्त पडतो. ह्या भागांतील पावसाचें सरासरी मान ७५ ते ८० इंच असतें. पेठ, इगतपुरी, त्र्यंबक एथें तर ११०–११५ इंच पाऊस पडूं शकतो.

मध्यभागांतील पावसाचें मान सरासरी ३० ते ३५ इंच असतें. तथापि ढग हे साधारणपणें डोंगरांच्या आश्रयानें वहातात; ह्मणून

---

१ पाऊस पडल्यावर पाणी जिरून किंवा वाहून न जातां जागच्याजागीं राहिलें तर तें जितकें इंच उंच भरेल तितके इंच पाऊस पडला असें ह्मणतात.

ज्या भागांतून डोंगरांच्या रांगा गेलेल्या आहेत, त्यांत पावसाचें मान अधिक असतें. मुल्हेर, ( बागलाण ) चांदवड, ठाणगांव, ( सिन्नर ) एथें ह्याच कारणानें ४०–४५ इंच पाऊस पडतो. पूर्व भाग विशेष डोंगराळ नसल्यानें तिकडे पर्जन्याचें मान बरेंच कमी ह्मणजे सरासरी १८–२० इंच असतें.

पावसाळा सरासरी चार महिने जून ते सप्टेंबर अखेर असतो. जिल्ह्यांतील पावसाचें सरासरी मान ३० इंच पडतें. ( अलीकडे १०–१२ वर्षांत पूर्वीपेक्षां पावसाचें मान कमी झालेलें आहे. )

---

## ७ जमीन व उत्पन्न.

जमिनीची योग्यता, पाऊस व हवामान ह्यांवर तींतील उत्पन्नाचें मान अवलंबून असतें. ह्या जिल्ह्यांत जमिनीचे बहुतेक प्रकार असून त्यांतून पुष्कळ प्रकारचें उत्पन्न होतें. कोकणांत पिकणारें भात व खानदेशांत होणारा कापूस ह्या जिल्ह्यांतही थोडा फार होतो.

पश्चिम भाग हा डोंगराळ, फार उतरता व विशेष पर्जन्याचा असल्यामुळें तिकडील माती धुपून जाऊन जमिनी बरड झालेल्या आहेत. ह्या जमिनीचा रंग कोठें तांबूस[1] व कोठें पांढुरका[2] असा आहे. म्हणून ह्या भागांत नाचणी, वरई, सावा इ० कोंकणी धान्यें; मठ, मूग, मसूर, कुळीथ, तूर इ० कडधान्यें व खुरासणी, थोडा जपानी भुईमूग ( अलीकडे लावूं लागले आहेत ) इ० गळिताचीं धान्यें हीं पिकें होतात. डोंगरांच्या लहानसहान खोऱ्यांतून गाळ

---

१ जींत लोखंड वगैरे खनिज पदार्थ विशेष असतात. ती जमीन तांबूस असते. २ चुनखडी विशेष असल्यास पांढुरकी बनते.

सांचवून तेथें सुपीक जमिनी बनविल्या आहेत, त्यांत विशेषतः निरनिराळ्या जातीचें भात व कांहीं ठिकाणीं गहूं, हरभरा हीं पिकें येतात.

मध्य भागाची जमीन कमी उताराची असून पांढुरकी व काळसर अशी आहे. व पाऊसही बेताचा पडतो. म्हणून ह्या भागांतील पिकें चांगलीं येतात. जिराईत जमिनींत बाजरी, गहूं हीं धान्यें, तूर, हरभरा इ० कडधान्यें व खुरासणी, करडई, आळशी, भुईमूग इ० गळिताचीं धान्यें हीं पिकें येतात.

ह्या भागांत बऱ्याच ठिकाणीं पाटाच्या पाण्याची सोय आहे व बहुतेक ठिकाणीं विहिरीही खणलेल्या आहेत, म्हणून बागाईत जमिनी पुष्कळ आहेत. त्यांत गहूं, हरभरा, ऊंस, देशी भुईमूग, भाजीपाला, फळफळावळ इ० जिन्नस, जमिनीची सुपीकता व ऋतुमान ह्यांस अनुसरून होतात. बेज, ( कळवण ) पाटणें, खाकुर्डी ( मालेगांव ता० ) जानोरी, ( दिंडोरी ) इ० कांहीं ठिकाणीं बागाइतांतही चांगल्याप्रकारचें भात पिकतें.

पूर्व भागांतील जमिनी काळ्या[२] व सुपीक अशा आहेत; पण पाऊस बेताचा आणि नियमित वेळीं पडत गेला तरच पीक चांगलें येतें. ह्या भागांत ज्वारी, जोंधळा, बाजरी, गहूं हीं धान्यें; हरभरा, तूर हीं कडधान्यें; तीळ, करडई हीं गळिताचीं धान्यें व थोडा कापूस हीं पिकें ऋतुमानाप्रमाणें व जमिनीच्या कसाप्रमाणें होतात.

---

१ देशी भागांत पाऊस कमी म्हणून नद्यांस बंधारे घालून तलाव करावे लागतात व कोंकणी भागांत माती कमी म्हणून खोऱ्यांचे तोंडास बांध घालून आवणें तयार करावीं लागतात.

२ ज्या जमिनींत सेंद्रियद्रव्यें—वनस्पती व प्राणी ह्यांचे अंशविशेष—असतात, ती जमीन काळी असते.

ह्या भागांत पाटाच्या पाण्याची सोय फारशी नाहीं व विहिरीही कमीच आहेत, त्यामुळें बागाइती पिकें कमी होतात.

ह्या जिल्ह्यांतील एकंदर लागवडीस आलेली जमीन सुमारें २५,५१,४७८. एकर आहे. तीपैकीं कांहीं जिराईत व कांहीं बागाईत आहे.

[ वर लिहिलेल्या पिकांपैकीं ज्वारी, तूर, भात, कापूस, हरभऱ्यांशिवाय कडधान्यें, खुरासणी, तीळ, भुईमूग इ० पिकें पावसाळ्यांत होतात, म्हणून ह्यांस 'खरिपाचीं पिकें' असें म्हणतात. आणि गहूं, हरभरा, करडई, आळशी इ० पिकें हिंवाळ्यांत होतात, म्हणून ह्यांस 'रब्बीचीं पिकें' म्हणतात ]

**इतर उत्पन्न**—ह्या जिल्ह्यांतील बहुतेक भागांत आंबे होतात. त्यांत वडनेर, ( चांदवड ), दिंडोरी, नांदगांव, नासिक, सिन्नर एथें आंबराया पुष्कळ आहेत. मध्यभागांत बऱ्याच ठिकाणीं द्राक्षांचे मळे आहेत; त्यांत नासिक, निफाड, सिन्नर, ह्या तालुक्यांत विशेष आहेत. सिन्नर, वडनेर, धोडंबें, ( चांदवड ) अंदरसूल ( ता० येवलें ) एथें विड्यांचीं पानें होतात. पेरू, केळीं, लिंबें ह्यांच्या बागा पुष्कळ ठिकाणीं आहेत. नासिक हें क्षेत्र असल्यानें तेथें फुलांच्या बागा आहेत.

**जंगली उत्पन्न**—डोंगरी भागांत राखून ठेविलेलें जंगल

---

१ पावसाखेरीज इतर पाण्याची सोय नसतां पिकणारी जमीन व तींतील उत्पन्न ह्यांस ' जिराईत' म्हणतात.

२ पाट, विहिरी इ० च्या पाण्यानें पिकणारी जमीन व तींतील उत्पन्न ह्यांस ' बागाईत ' म्हणतात.

३ द्राक्षाला हवा दमसर व पाऊस बेताचा लागतो.

४ विड्याचे पानांस हवा निवाऱ्याची, पाऊस कमी, जमीन मध्यम व पाणी सतत टिकणारें असें लागतें.

(फॉरेस्ट) आहे, त्यांत साग, शिसव, तिवस इ० इमारती लाकडें; बाभूळ, खैर इ० जळाऊ लाकडें; मोह, हिरडे, ब्याहाडे इ० फळें व वेळू, गवत इ० पदार्थ ह्यांचें उत्पन्न बरेंच होतें.

डोंगरी लोक मध, मेण, डिंक, काथ, वाळा, इ० जंगली पदार्थ; आणि करवंदें, बोरें, जांभळें, आळूं इ० जंगली फळें काढून विकतात. " ह्यांचें उत्पन्न विशेषेंकरून पेठ तालुक्यांत होतें. "

पश्चिम भागांतील डोंगराळ प्रदेशांतून गवत फार होत असल्यानें त्याचा पुरवठा इतर भागास बराच होतो.

---

**प्राणी**—डोंगराळ प्रदेशांत रानडुकरें, लांडगे, कोल्हे, हरणें, ससे, माकडें व क्वचित् वाघ हे वन्यपशु आढळतात. डोंगरी लोक ह्यांची शिकार करितात.

विषारी सर्पांच्या जाति बऱ्याच आहेत. विकारी डांस, पिसा, ढेंकूण, विंचू, हे तर सर्वत्र आढळतात.

गाई, म्हशी, घोडीं, गाढवें, बकरीं, मेंढरें हीं पाळींव जनावरें सर्वत्र आहेत.

**खनिज पदार्थ**—इमारतीचा काळा दगड, चुनखडी व शिरगोळा हे पदार्थ खाणींत सांपडतात. कोठें कोठें गेरूसारखी तांबडी व शाडूसारखी पांढरी माती आढळते. इतर महत्त्वाचे खनिज पदार्थ—धातु, गंधक इ० अद्यापि आढळले नाहींत.

---

१ ह्या जातीचा दगड ज्वालामुखीच्या लाव्हा ( बॅसाल्ट ) पासून बनलेला आहे असा शोध लागतो.

## ८ लोकवस्ती वगैरे.

**लोकसंख्या**—ह्या जिल्ह्याची लोकसंख्या ८,३२,५७६ आहे. तींत पुरुष ४,२४,३५९ व स्त्रिया ४,०८,२१७ आहेत. दर चौरस मैलास लोकसंख्येचें प्रमाण सुमारें १४४ पडतें. सर्वांत निफाड तालुका हा दाट वस्तीचा आहे, त्यांत दर चौरस मैलास १८६ असें प्रमाण पडतें. चांगली हवा, सुपीक जमीन व पाण्याची समृद्धि ह्या कारणांनीं ह्या तालुक्यांत दाट वस्ती झाली आहे.

नासिक ( ३८, २३०. ) मालेगांव ( २३,५०५. ) व येवलें ( १३,९११. ) हीं मोठालीं शहरें ह्या जिल्ह्यांत आहेत. तीं वगळलीं असतां इतर तालुक्यांतून लोकवस्तीचें प्रमाण विशेष फरकाचें नाहीं. पण बागलाण तालुक्यांत हें प्रमाण बरेंच कमी म्हणजे १०८ आहे.

**धर्म, जाति, धंदा वगैरे**—एकंदर लोकसंख्येंत शेंकडा ९२ हिंदु, ५॥ मुसलमान व बाकीचे जैन, ख्रिस्ती, पार्शी, डोंगरी वगैरे आहेत.

हिंदु ( ७,७०,२८४. ) ह्यांत अनेक वर्ग आहेत तेः—

( अ ) **शेतकरी मजूरवर्ग**—ह्यांत मोठा भरणा मराठ्यांचा आहे. हे लोक मुख्यत्वें शेतीचा व मजुरीचा धंदा करितात. ह्यांच्यांत देशमूख, कुणबी, वंजारी, माळी इ० पोटजाति आहेत. देशमुख हे उच्चवर्गाचे गणले जात असून त्यांच्यांत स्त्रियांना गोषा असतो व त्या पुनर्विवाह करीत नाहींत.

( ब ) **कारागिरवर्ग**—ह्यांत सोनार, सुतार, लोहार, कुंभार, तांबट, कासार, शिंपी, न्हावी, तेली, परीट, धनगर, इ० लोक येतात. हे आपआपला वडिलोपार्जित धंदा किंवा मजुरी करितात.

**( क ) पांढरपेशांचा वर्ग**—ह्यांत शिक्षणानें पुढें सरसावलेल्या आणि चालीरीतींनीं सुधारलेल्या अशा ब्राह्मण व व्यापारी वर्गांचा समावेश होतो.

**ब्राह्मण**–( २३,४८४ ) हे एकंदर लोकसंख्येंत शें० २·८ असून यजमानाकारितां धार्मिक कृत्यें करतात आणि सरकारी अथवा खाजगी नोकरीचा धंदा करून पोट भरतात. ह्यांतील २/३ वस्ती नासिक व त्र्यंबक एथेंच आहे. हीं गांवें क्षेत्राचीं असल्यानें ते येथें तीर्थोपाध्यायाचीं कामें करून असतात.

**व्यापारी**—ह्यांत मारवाडी, गुजराथी, भाट्ये, लाडसिक्के व लिंगाईत ह्यांचा समावेश होतो. मारवाडी जिल्ह्यांत सर्वत्र आहेत. लाडसिक्के जिल्ह्याच्या उत्तरभागांतच आहेत. हे सर्व लोक व्यापार, दलाली व सावकारी हे धंदे करितात. भाट्ये लोक धार्मिक आहेत. पांजरपोळ व सदावर्तें ह्यांचींच असतात. कित्येक लिंगाईत पटवेकऱ्यांचा धंदा करितात.

**[ड] अस्पृश्य मानलेला वर्ग**—ह्यांत मुख्यतः महार, चांभार, मांग ह्यांचा समावेश होतो. महार गांवकी, मजुरी वगैरेचा; चांभार कातड्याचा; मांग बुरूडकामाचा व घायपाताचा वाक काढण्याचा धंदा करितात.

**जैन**—(७,५२६.) ह्या धर्मांचे लोक जिल्ह्यांत थोडे असून व्यापार करितात. हे बहुधा सघन असतात. ‘ हिंसा न करणें ’ हा त्यांचा मुख्य धर्म असून ह्यांचीं प्रेक्षणीय मंदिरें सर्व शहरांतून आहेत.

**मुसलमान**—( ४६,४५८. ) ह्यांतील बहुतेक सुनी पंथाचे असून व्यापार, शेतकी व किरकोळ लहान धंदे करितात. कांहीं शीया पंथाचे लोक शहरांतून आहेत. ते बहुतेक बोहोरीच

आहेत. ते स्टेशनरी सामानाची दुकानदारी करितात. मुसलमानांतील 'मोमीन' हा वर्ग सुती लुगडीं व पागोटीं विणण्याचा धंदा करितो. ह्यांची वस्ती मालेगांव येथें फार आहे. येवलें येथेंही ह्या लोकांची वस्ती बरीच आहे.

**ख्रिश्चन**—[ ७,२७०. ] ह्यांची वस्ती शरणपुरी, [ नासिकजवळ ] इगतपुरी, भगूर, मनमाड, मालेगांव वगैरे ठिकाणीं असून त्यांत शरणपुरी, इगतपुरी एथें जास्त आहे. ह्यांतील इंडियन ख्रिश्चन हे धर्मोपदेशकाचा व शाळा चालविण्याचा धंदा करितात.

**पार्शी**—( ११२. ) ह्यांची तुरळक वस्ती शहरांतून आढळते. हे लोक व्यापार करून राहतात. इगतपुरी एथें त्यांची वस्ती बरीच आहे.

**डोंगरी**—( १,०९,१८८ ) ह्यांत भिल्ल, कोळी, वारली ह्या जाति आहेत. विशेष वस्ती डोंगराळ प्रदेशांत असून प्रत्येक गांवीं थोडे फार लोक असतातच. डोंगरी भागांतील लोक शेती व जंगलांतील पदार्थ ह्यांवर निर्वाह करतात व इतर भागांतील लोक बहुधा मजुरी करतात. हे लोक फार अशिक्षित असून त्यांच्या समजुती धर्मभोळेपणाच्या आहेत. अलीकडे पोलिसखात्यांत ह्या लोकांची भरती होऊं लागली आहे. ह्यांच्या शिक्षणाकरितां सरकारनें पेठ एथें एक बोर्डिंग स्थापन केलें आहे.

---

**भाषा**—जिल्ह्यांतील शेंकडा ९० लोक मराठी भाषा बोलतात. शेंकडा ५॥ उर्दू भाषा बोलणारे आहेत व बाकीचे लोक गुजराथी, मारवाडी, इंग्रजी इ० निरनिराळ्या भाषा बोलणारे आहेत; तरी ज्यांस मराठी भाषा मुळींच समजत नाहीं,

अशीं माणसें, शें० एक तरी सांपडतील किंवा नाहीं ह्याची शंकाच आहे.

---

**शिक्षण**—ह्या जिल्ह्यांत शेंकडा ४·२ लोक शिकलेले असून त्यांत शें० १/२ इंग्रजी जाणणारे असतील. पांढरपेशांचा वर्ग हाच शिक्षणांत पुढें सरसावलेला आहे. सरकारी व खाजगी मिळून ५१८ शाळा जिल्ह्यांत आहेत. त्यांत मुलांच्या ४८० व मुलींच्या ३८ आहेत. खाजगी शाळांत मिशनरींच्या शाळा १७ आहेत. ह्या सर्व शाळांतून २८,४९९ मुलगे व २,१३२ मुली शिकत आहेत.

नासिक येथें एक सरकारी हायस्कूल असून येवलें व मालेगांव येथें म्युनिसिपल् इंग्रजी शाळा आहेत. ह्यांशिवाय नासिक, इगतपुरी, मनमाड, मालेगांव कँप, सिन्नर एथें मिशनऱ्यांनीं काढलेल्या इंग्रजी शाळा आहेत. सटाणें येथील मराठी शाळेस इंग्रजी शिकविण्याचा वर्ग जोडिला आहे.

नासिक, त्र्यंबक, येवलें येथें संस्कृत पाठशाळा आहेत. मालेगांव, येवलें येथें विणकामाच्या शाळा आहेत.

## लोकस्थिति, रीतिरिवाज व स्वभावः—

पश्चिम भागांतील लोक काटक, कष्टाळू, गरीब, विश्वासू आणि अल्पसंतोषी आहेत. पीक कमी व हलक्या प्रतीचें येतें म्हणून ते दरिद्री आहेत. रोगट हवा, वाईट पाणी, हलकें अन्न व चढउताराचें काम ह्यांमुळें त्यांचीं शरीरें कृश बनून पोटें तेवढीं मोठीं असतात. त्यांना शिक्षणाचा गंधही नसून ते गलिच्छ व दारूबाज असतात. ह्यांचीं घरें लहान व गवताचीं असून गांवेंही दहा बारा झोंपड्यांनीं झालेलीं, टेंकड्यांवर व एका गांवांतील हाक दुसऱ्या गांवीं ऐकूं जाईल इतकीं जवळ जवळ असतात.

इतर भागांतील लोकांची स्थिति साधारणपणें मध्यमप्रतीची आहे. लोकांत शिक्षणाचा पसार दिवसानुदिवस जास्त होत आहे. लोक शांत, हुषार व मेहनती आहेत. मध्यभागांत पाऊस जास्त पडत असल्यानें घरें कौलारू आहेत; पण पूर्वभागांत पाऊस कमी पडत असल्यानें घरें धाब्याचीं आहेत. दोन्ही भागांतील गांवें मोठालीं असून तीं दूर दूर असतात.

[ ह्या जिल्ह्यांतील लोकांचा स्वभाव व राहणी ह्यांवर लगतच्या जिल्ह्यांतील लोकांच्या सहवासाचा कांहींसा परिणाम झालेला दिसतो. उत्तर भागचे लोक खानदेशांतील लोकांप्रमाणें कांहींसे भोळसर असून सधन व उदार आहेत. दक्षिणभागचे लोक नगर जिल्ह्यांतील लोकांप्रमाणें कांहींसे राकट आहेत. मध्यभागांतील लोक पुणें जिल्ह्यांतील लोकांसारखे शहाणे व व्यवहारदक्ष आहेत आणि पश्चिम भागालगतचे लोक ठाणें जिल्ह्याप्रमाणें आहेत. ]

---

## ९ उद्योगधंदे व कारखाने.

ह्या जिल्ह्यांतील लोकांचा मुख्य धंदा 'शेतीचा' आहे. शेंकडा ६६ लोक शेतकरी असून बाकीचे लोक कारागीर, व्यापारी, धंदेवाले, मजूर, नोकर असे आहेत.

दुसरा धंदा—' वीणकामाचा '—हा होय. येवलें येथें पैठण्या, पितांबर हीं रेशमी व जरीचीं वस्त्रें, तशींच पागोटीं, लुगडीं हीं होतात. अलीकडेस अंदरसूल व नागडें एथेंही असलीं रेशमी वस्त्रें होऊं लागलीं आहेत. मालेगांव, सिन्नर, नासिक येथें रेशमी व सुती लुगडीं तयार होतात. शिवाय नामपूर, विंचूर, निफाड, सायखेडें, सुकेणें येथेंही कांहीं विणकर लोक आहेत. उत्तर भागांत बऱ्याच ठिकाणीं खाद्या व झोन्ये चांगले तयार होतात. विशेषतः

महार लोक हा धंदा करितात. पुष्कळ ठिकाणीं लोंकरीच्या घोंगड्या विणण्याचा धंदा धनगर लोक करितात.

तिसरा धंदा—'कापड रंगविण्याचा'—हा मालेगांवीं, त्याचे आसपासच्या गांवांतून व थोडा फार इतर ठिकाणींही चालतो. त्यांत मालेगांव एथील जाजमें व पासोड्या हीं प्रसिद्ध आहेत.

चवथा धंदा—'भांडीं करण्याचा,—हा नासिक, ओझर व चांदवड येथें चालतो. चांदी, तांबें व पितळ ह्यांचीं नासिक एथील भांडीं प्रसिद्धच आहेत. अलीकडे नासिक येथें सोन्यारुप्याचे दागिनेही चांगले होऊं लागले आहेत.

याशिवाय सायखेडें येथील कुलपें, चांदवड येथील पोहोरे, फण्या व चढाऊ बूट; ओझरचे आडाकित्ते व वस्तरे प्रसिद्ध आहेत. तेल काढणें, टोपल्या विणणें, कातडीं कमावणें, घायपाताचीं चऱ्हाटें करणें वगैरे धंदे सर्वत्र चालतात.

**करखाने**—पूर्व भागांत कापूस[1] पिकतो; त्याच्या सरक्या काढण्याच्या गिरण्या मालेगांव, मनमाड, नांदगांव, नायडोंगरी, मालेगांवकन्नड, ( नांदगांव ) व झोडगें ( मालेगांव ) ह्या ठिकाणीं आहेत. मालेगांव, नांदगांव येथें कापसाचे गठ्ठे बांधण्याचे 'प्रेस' ही आहेत.

नासिक, येवलें व मालेगांव ह्या शहरांतून दळणें, तेल काढणें ह्यांच्या लहान लहान गिरण्या आहेत. मालेगांव येथें पीठ दळण्याच्या पाणचक्क्या आहेत. रोशेल तेल काढण्याच्या भट्ट्या हिंवाळ्यांत डोंगरी भागांत सुरू असतात. नासिक एथें देशी दारू करण्याचा सरकारी कारखाना आहे. दिंडोरी व बेज एथें ऊस गाळण्याचे कारखाने आहेत.

---

1 कापसास उष्ण हवा, मध्यम जमीन व कमी पाऊस लागतो.

## १० दळणवळणाचीं साधनें.

ह्या जिल्ह्यांतील मध्य व दक्षिण भागांत दळणवळणाच्या मार्गांची सोय बरी आहे, पण उत्तर भागांत अद्यापि चांगलीशी सोय झालेली नाहीं.

### ( अ ) आगगाडीचे रस्ते—

१ ग्रेट इंडियन पेनिन्सुला रेलवे—( जी. आय. पी. आर. ) हा रस्ता मुंबईहून कासारें घाटांतून येऊन **इगतपुरी** घोटी, पाडली, आस्वली, लहवीद ( इगतपुरी ता० ); **देवळाली-नाशिक**, ओढें ( नासिक ता० ); खेरवाडी. थेरगांव. निफाड; उगांव, लासलगांव (निफाड ता०); समीट, रापली, (चांदवड ता०); **मनमाड**, पानेवाडी, हिसूळ, पांझण, **नांदगांव**, पिंपरखेडा व नायडोंगरी ( ता० नांदगांव ); ह्या स्टेशनांवरून पूर्व खान देशांत गेला आहे. ( मोठ्या टाइपांतील गांवीं मेल उभी राहते ).

मनमाड (जंक्शन) हून ह्या रस्त्यास दोन फांटे फुटले आहेत.

(१) दौंड-मनमाड रेलवे—हा फांटा मनमाड, अणकई व येवलें ह्या स्टेशनांवरून नगर जिल्ह्यांतून पुणें जिल्ह्यांतील दौंडपर्यंत गेला आहे.

( २ ) गोदावरी व्हॅली[२] रेलवे—( एन. जी. एस्. आर. ) हा फांटा मनमाड, अणकई, नगरसूल, व तळवाडें ( ता० येवलें ) ह्या स्टेशनांवरून औरंगाबादेकडे गेला आहे.

( मनमाड, इगतपुरी व नांदगांव एथें रेलवेचे कारखाने आहेत. )

नासिक स्टेशनापासून नासिकपर्यंत ५ मैल ट्रामचा रस्ता आहे. व मनमाडपासून मालेगांवपर्यंत मोटारगाड्या चालतात.

---

१ हिंदुस्तानच्या द्वीपकल्पांतील आगगाडीचा मोठा रस्ता.

२ दरी किंवा खोरें.

## ( ब ) पक्क्या सडकांचे रस्तेः—

**मुख्य रस्ता**—मुंबई–आग्रा–रोड-हा रस्ता मुंबईहून निघून सह्याद्रींतील थळघाटांतून इगतपुरी, घोटी, नासिक, ओझर, पिंपळगांवबसवंत, ( निफाड ) चांदवड, उमराणें, मालेगांव व झोडगें ह्या मोठ्या गांवांवरून पश्चिम खानदेशांतील धुळें शहरावरून आग्ऱ्यास गेला आहे. ह्याला अनेक फांटे फुटलेले आहेत ते—

१ घोटी बुद्रूकवरून आकोल्यास ( जि० नगर ) गेला आहे.

२ घोटीबुद्रुकहून वाकी, कुरणोली, म्हसुर्ली झारवड, आलवंड यांवरून ठाणें जिल्ह्यांत खोडाळ्याकडे गेला आहे.

३ नासिकहून सिन्नर, संगमनेर ( जि० नगर ) वरून पुण्यास गेला आहे.

( अ ) ह्याचा एक फांटा देवळाली, भगूर, पांढुरली ह्यांवरून जाऊन सिन्नर एथें वरील रस्त्यास मिळाला आहे व ( आ ) दुसरा एक फांटा सिन्नरहून दातली, खोपडी व पांगरी यांवरून वावी पर्यंत गेला आहे.

४ नासिकहून त्र्यंबकेश्वरास गेला आहे.

५ नासिकहून सीताघाटांतून हरसुलवरून गोलदरीस गेला आहे.

( अ ) ह्याचा एक फांटा हरसुलाहून करंजाळीकडे गेला आहे.

६ नासिकहून रामशेजवरून सावळ–घाटांतून पेठेवरून बलसाड–कडे गेला आहे.

( अ ) ह्याचा एक फांटा गोलशीहून निघून ननाशीवरून बाऱ्ह्यास गेला आहे.

७ नासिकहून म्हसरूळ बारींतून दिंडोरी, वणीवरून अहिवंत बारींतून कळवण वरून देवळ्यास गेला आहे.

८ पिंपळगांवाहून निफाड, विंचूर व येवलें ह्यांवरून औरंगाबादेकडे गेला आहे.

( अ ) ह्याचा एक फांटा निफाडहून देवपूर, वावीवरून राहुरी ( जि० नगर ) कडे गेला आहे.

९ चांदवड जवळून भावडबारींतून देवळें, लोहोणेर, सटाणें, वीरगांव ह्यांवरून पश्चिम खानदेशांत पिंपळनेराकडे गेला आहे.

१० चांदवडहून लासलगांवावरून विंचुरास गेला आहे.

११ मालेगांवाहून मनमाड, येवलें ह्यांवरून नगरास गेला आहे.

१२ मालेगांवाहून नांदगांवावरून औरंगाबादेस गेला आहे.

१३ मालेगांवाहून आघारवरून सटाण्यास गेला आहे.

१४ ओझरहून खेरवाडीवरून चांदोरीपर्यंत गेला आहे.

या शिवाय कच्च्या सडका अनेक आहेत. पक्क्या सडकांस जागजागीं टोल नाकीं आहेत, तेथें ठराविक दस्तुरी घेतात. मोठमोठ्या अमलदारांस उतरण्याकरितां प्रवासाच्या सोयीनें कित्येक ठिकाणीं रहदारी बंगले बांधलेले आहेत.

---

## ११ व्यापार.

ह्या जिल्ह्यांत नासिक, येवलें, मालेगांव, लासलगांव, नांदगांव व घोटी ह्या व्यापाराच्या मुख्य पेठा आहेत. आसपासचा माल एथून बाहेर गांवीं जातो व बाहेरचा माल मुख्यत्वेंकरून ह्याच पेठांतून इतर गांवांना मिळतो. यांशिवाय सिन्नर, वावी, वणी, भगूर इ० ठिकाणीं हंगामांत मोठे बाजार भरतात. आणि इतर मोठ्या गांवीं लहान बाजार नियमितवारीं भरत असतात.

**आयात माल**—धान्य, भाजीपाला ह्यांशिवाय इतर बहुतेक

माल म्हणजे कापड, काच, किराणा, कागद, साखर, घड्याळें, आगपेट्या, धातु, राकेल व इतर शेंकडों कारागिरीचे पदार्थ–देशी व परदेशी दोन्ही–मुंबईहून या जिल्ह्यांत येतात.

तूप हें खानदेश, वऱ्हाड, सांगली, धारवाड एथून येतें.

"बहुतेक सर्व कच्चा माल व जरूरीचा माल ह्या जिल्ह्यांत उत्पन्न होत असल्यामुळें इतर जिल्ह्यांतून वर लिहिलेल्याशिवाय फारसा माल ह्या जिल्ह्यांत येत नाहीं."

**निर्यात माल**—नासिक एथून भांडीं, भाजीपाला, फळफळावळ, सर्व प्रकारचीं धान्यें, हाडें, कातडीं वगैरे माल मुख्यत्वें मुंबईस रवाना होतो.

**येवलें**—एथून पैठण्या, पितांबर, पागोटीं, लुगडीं वगैरे जरीचा व रेशमी माल प्राचीन काळापासून इतर जिल्ह्यांत रवाना होत आला आहे.

**मालेगांव**—एथून लुगडीं, पासोड्या, झोऱ्ये, गूळ व कापूस हा माल बाहेरगांवीं रवाना होतो.

**लालसगांव**—एथून गहूं, बाजरी इ० धान्यें मुंबईस रवाना होतात.

**घोटी**—एथून तांदुळ परमुलखांत जातात.

" नासिकचीं भांडीं, येवल्याचें रेशमी कापड, घोटीचे तांदूळ व जिल्ह्यांतील बागायती उत्पन्न–भाजीपाला, फळफळावळ, कांदे, लसूण, गूळ, भुईमूग इ० माल ह्या जिल्ह्यांतून चोहोंकडे रवाना होत असल्याची प्रसिद्धी आहे. "

## १२ राज्यव्यवस्था.

**राजकीय विभाग**—नासिक जिल्हा हा, मुंबई इलाख्यांतील मध्य-भागांत मोडतो. ह्यांत एकंदर १६९५ गांवें आहेत. तालुके १२ असून त्यांचे तीन भाग केलेले आहेत; ते—

**उत्तरभाग**–( मालेगांव भाग )—कळवण, बागलाण, मालेगांव, नांदगांव.

**मध्यभाग**–( येवलें भाग )—इगतपुरी, निफाड, सिन्नर, येवलें.

**दक्षिणभाग**–( नासिक भाग )—नासिक, पेठ, दिंडोरी, चांदवड.

ह्या जिल्ह्यांत दोन मोठीं संस्थानें व १६३ इनामी गांवें आहेत.

### संस्थानें.

**सुरगाणें संस्थान**—हें 'देशमुख' आडनांवाच्या कोंकणी मराठे जातीच्या घराण्याकडे आहे. ह्याचें क्षेत्रफळ ३६० चौ० मैल असून वसूल सुमारें ४७,०००. रु० आहे. ह्यावर जिल्ह्याच्या कलेक्टर–साहेबांची देखरेख असते. संस्थानिकांस संस्थानच्या आंतर्व्यवस्थेचे सर्व अधिकार आहेत.

**विंचूर संस्थान**—हें 'दाणी' आडनांवाच्या ब्राह्मण जातीच्या पेशवाईतील सुप्रसिद्ध सरदार घराण्याकडे आहे. ह्यांत सुमारें २६ गांवें असून वसूल अजमासें ३०,०००.रुपये आहे. संस्थानिकांस दिवाणी व फौजदारी अधिकार दिलेले आहेत.

इनाम ( जहागिरी ) गांवापैकीं कांहीं प्रसिद्ध गांवें:—

**चांदोरी**—हें निफाड तालुक्यांत गोदावरीचे कांठीं आहे. पेशव्यांचे दिल्ली येथील वकील 'देवराव हिंगणे' ह्यांस बादशाहानें इ० स० १७२८ त जहागिरी दिली. हिचें उत्पन्न सुमारें २०,०००. रुपये आहे. गांव बागायती आहे.

**सुकेणें**—हें निफाड तालुक्यांत बाणगंगेच्या कांठीं आहे. बाळाजी लक्ष्मण ह्यांनीं होळकरांपासून इ० स० १८०५ त जहागिरी मिळविली. हें गांव बागायती असून एथें द्राक्षेंही होतात.

**कोठूरें**—हा गांव गोदावरीच्या कांठीं आहे. शाहू महाराजांकडून इ० स० १७१९ मध्यें महादजी दाजी बरवे ( बाळाजी विश्वनाथांचे शालक ) ह्यांस जहागीर मिळाला.

**ओढें**—हें नासिक तालुक्यांत गोदावरीच्या कांठीं असून ' रंगराव ' ओढेकर ह्यांस पेशव्यांकडून जहागीर मिळालें. ह्यांनींच पंचवटींतिल काळ्या रामाचें मंदिर बांधिलें व उत्सवाच्या खर्चाकरितां ' शिंगवें ' गांव इनाम करून दिला आहे.

वडेल, काष्टी, व चंदनपुरी हीं गांवें ' गोविंदराव मोहनलाल आगरवाले ' ह्यांच्या जहागिरीचीं असून तीं हल्लीं कर्जामुळें सावकारांकडे गेलीं आहेत.

ह्यांशिवाय डोंगरगांव ( निफाड ), देवरगांव ( चांदवड ), टाकेद ( इगतपुरी ), घोडंबें ( चांदवड ) इ० मोठीं जहागिरीचीं गांवें आहेत.

---

**राज्यव्यवस्था**—जिल्ह्याच्या राज्यव्यवस्थेच्या सोयीकरितां निरनिराळीं खातीं ( कामाचे विभाग ) केलेलीं असून त्या प्रत्येकाचे मुख्य अधिकारी—जिल्ह्याचें मुख्य ठाणें—नासिक एथें राहतात. आणि वर्षांतून कांहीं महिने जिल्ह्यांत फिरून आपापलीं कामें चालवितात. तीं खातीं एणेंप्रमाणें—

**रेव्हिन्यू ( मुलकी ) खातें**—शेतसारा, प्राप्तीवरील कर इ० वसूल करून त्याची व्यवस्था लावणें व कांहीं फौजदारी गुन्ह्यांची चौकशी करून न्याय देणें वगैरे कामें ह्या खात्याकडे

असतात. ह्या खात्याचा इतर सर्व खात्यांशीं थोडाफार संबंध येतोच.

कलेक्टर हे खात्याचे मुख्य अधिकारी असून जिल्ह्याच्या सर्व व्यवस्थेची जबाबदारी ह्यांचेकडेच असते. ह्यांच्या हाताखालीं उत्तर भागावर असिस्टंट कलेक्टर, मध्य व दक्षिण भागांवर डिस्ट्रिक्ट डेप्युटी कलेक्टर आणि खजिन्यावर हुजूर डेप्युटी कलेक्टर हे अधिकारी असतात. तालुक्यांत मामलेदार व हेडकारकून हे अधिकारी असतात.

फौजदारी कामासंबंधानें कलेक्टर ह्यांस 'डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट' व इतरांस 'मॅजिस्ट्रेट' असें म्हणतात. ह्यांशिवाय कांहीं ठिकाणीं ऑनररी मॅजिस्ट्रेटही ( पगार न घेतां काम करणारे ) आहेत. नासिक एथें ऑनररी मॅजिस्ट्रेटांचें एक बेंच आहे.

**ज्युडीशियल् ( दिवाणी ) खातें**—ह्या खात्याकडे दिवाणी म्हणजे देवघेवीचे व मालमत्तेचे हक्क, वारस ह्यासंबंधीं आणि फौजदारी म्हणजे दरोडे, खून, जबरी वगैरे महत्वाच्या गुन्ह्यांची चौकशी करून न्याय देणें वगैरे कामें असतात. शिवाय ह्या खात्याकडे अपिलाचीं कामेंही असतात.

डिस्ट्रिक्ट जज्ज हे ह्या खात्याचे मुख्य अधिकारी असून फौजदारी कामासंबंधानें त्यांस सेशन्सजज्ज असें म्हणतात. ह्यांचे हाताखालीं सबूजज्ज ( मुनसफ ) हे अधिकारी असतात. ह्यांचीं कोर्टें[1] ह्या जिल्ह्यांत ६ आहेत; तीं:—नासिक, पिंपळगांवबसवंत, सिन्नर, येवलें, मालेगांव व सटाणें हीं होत.

**पोलिसखातें**—गुन्ह्यांचा तापस करणें, बंदोबस्त व शांतता राखणें हीं कामें ह्या खात्याकडे असतात.

---

१ इतर ऑफिसांस 'कचेरी' म्हणतात.

पोलिस सुपरिंटेंडेंट हे मुख्य अधिकारी असून त्यांचे हाताखालीं असिस्टंट पोलिस सुपरिंटेंडंट, डेप्युटी पो० सु० हे असतात. प्रत्येक भागावर पोलिस इन्स्पेक्टर व तालुक्यांत सब इन्स्पेक्टर ( फौजदार ) हे अधिकारी असतात.

**पब्लिकवर्क्स ( लोकोपयोगी कामाचें ) खातें**—ह्याचे दोन विभाग केलेले आहेत; ते—१ एंजिनियरिंग खातें. २ इरिगेशन खातें.

१ **एंजिनियरिंग खातें**—सडका, इमारती, पूल हीं बांधणें; तीं दुरुस्त करणें व त्यांची व्यवस्था ठेवणें, हीं कामें ह्या खात्याकडे असतात.

एक्झिक्यूटिव्ह एंजिनियर हे मुख्य अधिकारी असून त्यांचे हाताखालीं असिस्टंट एंजिनियर, सुपरवायझर, ओव्हरसियर व सब ओव्हरसियर हे अमलदार असतात.

२ **इरिगेशन खातें**—तलाव, पाट, बंधारे, कालवे वगैरे बांधून पाण्याची व्यवस्था लावणें, हीं कामें ह्या खात्याकडे असतात. ह्यांशिवाय नदींचें पाणी व पर्जन्य[1] मोजण्याचें काम असतें.

एंजिनियरींग खात्याप्रमाणेंच ह्या खात्याचेही अधिकारी असतात.

**फॉरेस्ट ( जंगल ) खातें**—जंगल राखणें, तोडणें, व त्यांतील उत्पन्नाची तजवीज करणें इ० कामें असतात. डिव्हिजनल् फॉरेस्ट ऑफिसर हे मुख्य असून त्यांचे हाताखालीं सब डि० फॉ० ऑ० व तालुक्यास रेंज फारेस्ट ऑफिसर हे कामगार असतात.

**मेडिकल खातें**—रोग्यास औषधोपचार करणें, रोगराई, स्वच्छता ह्यांची व्यवस्था पाहाणें हीं कामें ह्या खात्याकडे असतात.

जिल्ह्यास सिव्हिलसर्जन व त्यांचे हाताखालीं असिस्टंट सर्जन हे मुख्य अधिकारी असून दुसऱ्या प्रत्येक दवाखान्यावर सब असिस्टंट सर्जन ( डॉक्टर ) असतात.

---

१ पाऊस व उष्णता मोजण्याचें कामही ह्या खात्याकडे असतें.

प्रत्येक तालुक्याच्या गांवास एकेक दवाखाना असून त्यांशिवाय त्र्यंबक, भगूर कँप, पिंपळगांवबसवंत व मनमाड एथें दवाखाने आहेत. " दवाखान्यांत गरिबांस फुकट औषधोपचार होतो, पण इन्कमटॅक्स देणाराजवळून कांहीं फी घेतली जाते."

नासिक, येवलें व मालेगांव एथें गुरांचे दवाखाने आहेत.

**शाळाखातें**—नवीन शाळा देणें, शाळांची तपासणी करणें व शिक्षणसंबंधी व्यवस्था पहाणें इ० कामें ह्या खात्याकडे असतात.

डेप्युटी एज्युकॅशनल् इन्स्पेक्टर हे मुख्य अधिकारी असून प्रत्येक भागावर असिस्टंट डे० ए० इ० असतात.

**पोस्टखातें**—पत्रें, मनिऑर्डरी, पार्सलें वगैरे पोंचविणें आणि लोकांच्या ठेवींची देवघेव करणें ( सेव्हिंग ब्यांकूस् ) हीं कामें ह्या खात्याकडे असतात.

नासिक येथें हेड् ( मुख्य ) पोस्ट असून तालुक्याच्या व इतर मोठमोठ्या ठिकाणीं सबपोस्टें आहेत; तीं एकंदर १७ आहेत; कांहीं खेडेगांवांतूनही लहान ( ब्रँच ) पोस्टें आहेत. तीं ७४ आहेत. " ब्रँच पोस्टें बहुधा शाळामास्तरांकडे असतात."

नासिक, त्र्यंबक, येवलें, मालेगांव, निफाड, लासलगांव व सिन्नर एथील तार ऑफिसें पोस्टखात्यास जोडलेलीं आहेत.

यांशिवाय—खतें नोंदणारें **रजिस्टर खातें**, देवी काढणारें **व्हॅक्सिनेशन खातें**, अमली पदार्थांचा बंदोबस्त ठेवणारें **अबकारी खातें**, शेतकीची माहिती देणारें **अॅग्रिकल्चरल खातें**, जमीन मोजून प्रत लावणारें **सर्व्हे खातें**, इ० आणखी कित्येक खातीं आहेत.

ज्या खात्यांच्या व्यवस्थेंत लोकमत घेतलें जातें अशीं दोन खातीं आहेत; तीं—**लोकलबोर्ड** व **म्युनिसिपल बोर्ड** हीं होत.

---

१ दरसाल दर माणशीं ३ रुपये.

**लोकल–बोर्ड**–शेतसाऱ्यावर दर रुपयास एक आण्याप्रमाणें वसूल केलेल्या लोकलफंडाची व्यवस्था लावणें, म्हणजे विहिरी, धर्मशाळा, कच्च्या सडका, लहान पूल वगैरे थोड्या खर्चाचीं कामें करून त्यांची दुरुस्ती करणें हीं कामें ह्याकडे असतात.

[ शाळाखातें, मेडिकल्खातें व पब्लिक वर्क्स खातें ह्या खात्यांनाही लोकलफंडांतून कांहीं मदत मिळते. ]

तालुक्यांतील लोकांनीं निवडून दिलेले मेंबर आणि सरकारनें नेमलेले कांहीं मेंबर मिळून **तालुका लोकल बोर्ड** होतें. लोकनियुक्त मेंबर हे अध्यक्षाखेरीज एकंदर मेंबरांच्या संख्येच्या निम्म्यापेक्षां कमी नसतात. सरकारनें नेमलेल्या मेंबरांतही निम्म्यापेक्षां जास्त सरकारी अधिकारी नसतात. अध्यक्ष बहुतकरून सरकारनें नेमिलेला असतो व उपाध्यक्ष लोकनियुक्त असतो.

तालुका बोर्डानें निवडून दिलेले कांहीं मेंबर व सरकारनें नेमलेले कांहीं मेंबर ह्यांचें '**जिल्हाबोर्ड**' बनतें. ह्याचा प्रेसिडेंट लोकनियुक्त करण्याचें सुरू झालें आहे. ह्या बोर्डाचीं कामें तालुका लोकलबोर्डाप्रमाणेंच असून तीं मोठ्या प्रमाणावर चालतात. 'लोकांना ह्या बोर्डाचा फार चांगला उपयोग होत असतो.'

---

**म्युनिसिपल बोर्ड**—शहराची स्वच्छता, पाण्याचा पुरवठा, लोकशिक्षण, रस्त्यांची दुरुस्ती इ० कामें करण्याकरितां शहरांतील रहिवाशांवर भंगीपट्टी, घरपट्टी, पाणीपट्टी, मालावरील कर, यात्रेकऱ्यांवरील कर इ० पट्ट्या बसवून पैसा वसूल करून त्यांची व्यवस्था लावण्याचें काम ह्या बोर्डाकडे असतें.

---

१. ४८ रु० वर शेतसारा भरणारे व इन्कमटॅक्स देणारे लोक ह्यांना मत देण्याचा व निवडून येण्याचा हक्क असतो.

ह्या बोर्डांतही शहरांतील लोकांनीं निवडून दिलेले व सरकारनें नेमलेले असे मेंबर असतात. मेंबरांची संख्या शहरांतील लोकसंख्येवरून ठरविलेली असते. हें बोर्ड आपल्यांतून प्रेसिडेंट, व्हाइस प्रेसिडेंट, चेअरमन इ० अधिकारी निवडून कामें चालवितें.

सर्व मेंबरांची मिळून एक जनरल कमेटी होते. ती पोट कमेटया नेमून त्यांस कामें वाटून देते. शाळांची व्यवस्था पाहणारें तें स्कूलबोर्ड, शहराची स्वच्छता, दवाखाने, रस्ते वगैरेंची व्यवस्था ठेवणारें तें सॅनिटेशन् बोर्ड, पाण्याची व्यवस्था पाहणारें तें वॉटर-सप्लाय बोर्ड, अशा पोट कमेटया नेमून कामें चाललेलीं असतात.

ह्या जिल्ह्यांत नासिक, त्र्यंबक, येवलें, मालेगांव, इगतपुरी, नांदगांव व सिन्नर ह्या गांवीं म्युनिसिपालिट्या असून त्या म्युनिसिपालिट्यांचा प्रेसिडेंट लोकांनींच निवडून दिलेला असतो. नासिक, येवलें व मालेगांव ह्या म्युनिसिपालिटयांतून 'चीफ ऑफिसर' ह्मणून एक पगारी कामगार नेमिलेला असतो. त्याजवर म्युनिसिपालिटीच्या सर्व कामांची जबाबदारी असते.

**सॅनिटरी बोर्ड**—हें साधारण मोठ्या वस्तीच्या गांवांत असतें त्याची व्यवस्था, म्युनिसिपालिटीप्रमाणेंच पण लहान प्रमाणावर असते. एकच मंडळी असून ती शिक्षणाशिवाय इतर सर्व गांव—सफाईचीं कामें पहाते. या मंडळीचे सर्व मेंबर सरकारनें नेमलेले असतात.

ह्याशिवाय **नोटिफाईड एरिया कमिट्या** ह्या नांवाच्या संस्था असतात. रेलवे स्टेशनपासून एक मैलाच्या आंत असलेल्या मोठ्या गांवीं किंवा तालुक्याच्या ठाण्याच्या गांवीं त्या स्थापितां येतात. त्यांची रचना सॅनिटरी बोर्डाप्रमाणेंच असते. अशा कमिट्या मनमाड व सटाणें एथें आहेत.

---

१ विशिष्ट घरपट्टी देणारे, २० रु. वरचे नोकर व पदवीधर ह्यांस मत देण्याचा व निवडून येण्याचा हक्क असतो.

# १३ नासिक जिल्ह्याचें महत्त्व.



१ धार्मिक महत्त्व—फार प्राचीन काळापासून हा प्रांत हिंदुस्तानांत सर्वश्रुत आहे. हिंदुधर्मांत पवित्र मानलेली गोदावरी नदी, तिच्या कांठचें नासिक व पंचवटी शहर, (ह्यांचा उल्लेख रामायणांत आहे. ) बारा ज्योतिर्लिंगांपैकीं श्रीत्र्यंबकेश्वराचें स्थान, देवीचें सुप्रसिद्ध पीठ सप्तशृंग, ह्या तीर्थक्षेत्रांमुळें हा प्रांत दक्षिण हिंदुस्तानांत तर फारच प्रसिद्ध आहे. प्राचीन आर्यविद्या शिकविण्याचें व धर्मसंबंधी निवाडापत्रें देण्याचें काम नासिक क्षेत्रांतील विद्वान् ब्राह्मणांकडे फार दिवसांपासून आहे. व अजूनही हें महत्त्व अगदींच कमी झालेलें नाहीं.

२ ऐतिहासिक महत्त्व—इ० सन १००० पासून ह्या प्रांताचा इतिहास सांगतां येतो. नासिक जवळच्या लेण्यांतील शिलालेखांवरून असें दिसतें कीं, इ० स० ११००–१२०० मध्यें जैनधर्मी राजांचा अंमल एथें असावा.

तेराव्या शतकांत देवगिरीच्या यादव घराण्याकडे हा प्रांत होता. इ० स० १३०० नंतर बाहामणी राजांकडे, नंतर नगरच्या निजामशाही घराण्याकडे हा प्रांत गेला व पुढें त्यांपासून मोंगलांनीं जिंकून घेतला. मोंगल सुभेदारानें नासिक शहरास 'गुलछनाबाद' असें नांव देऊन सुभ्याचें मुख्य ठाणें केलें.

इ० सन १६७२ पासून मराठे ह्या प्रांतांत लुटालूट करून चौथाईचा हक्क वसूल करूं लागले, आणि इ० स० १७५० मध्यें हा प्रांत त्यांच्या अमलाखालीं आला. इ० स० १७६१ पासून—थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीपासून—नासिक शहर भरभराटीस येऊं

लागलें. पेशव्यांनीं एथें वाडा बांधिला, व ' क्षेत्रांचा गांव ' म्हणून ते एथें मधून मधून राहूं लागले. त्यामुळें एथें देवळें, कुंडें, घाट, इमारती हीं नवीन होऊं लागलीं.

पुढें मराठे [ पेशवे ] व इंग्रज ह्यांची लढाई होऊन इ० स० १८१८ मध्यें हा जिल्हा इंग्लिश अमलाखालीं आला. हल्लीं जेवढ्या भागाला नासिक जिल्हा असें म्हणतात, तो भाग पुष्कळ फेरफार होऊन बनलेला आहे. मोंगलांचे अमलांत ' नासिक सुभा ' होता; पण त्या वेळीं किती मुलूख त्यांत मोडत असे, हें नक्की समजत नाहीं. मराठ्यांच्या अमलांत हल्लींच्या जिल्ह्यापैकीं बागलाण, मालेगांव, नांदगांव व कळवण हे तालुके, खानदेशाकडे; पेठ बेगमच्या संस्थानाकडे व बाकीचे सर्व नगर जिल्ह्याकडे मोडत होते. इंग्रजी अमलांत सन १८६९ सालीं हा नासिक जिल्हा 'स्वतंत्र' असा बनविण्यांत आला.

[ राजकीय विभाग हे राज्यव्यवस्थेच्या सोईप्रमाणें नेहमीं बदलत असतात. ]

३ **व्यापारविषयक महत्त्व**--नासिक व येवलें ह्या दोन शहरांवरून ह्या जिल्ह्याची व्यापारविषयक प्रसिद्धि इतर प्रांतीं बरेच दिवसांपासून आहे. नासिकचीं भांडीं व येवलें येथील रेशमाचें व जरीचें कापड, ह्यांमुळें मुसलमानी अमलापासून तों आजतागाईत ह्याचें महत्व कमी झालेलें नाहीं.

---

१ तीर्थ, देवालय, किंवा साधूचा समाधि ह्यांच्या प्रसिद्धीमुळें पवित्र मानलेला गांव.

## १४ नासिक शहराचें वर्णन.

नासिक हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण इ० सन १८६९ पासून झालें. हें सुप्रसिद्ध क्षेत्र, गोदावरी नदीच्या दक्षिण तीरावर वसलें असून नदीचा प्रवाह शहराच्या उत्तर व पूर्व दिशेनें वहात आहे. हें शहर जी० आय० पी० रेलवेच्या नासिकरोड स्टेश-नापासून उत्तरेस ५ मैलांवर असून जाण्यास ट्रामगाड्या व टांगे मिळतात.

[ लंकेचा राजा रावण ह्याची बहीण ‘ शूर्पणखा ’ हिचें नाक लक्ष्मणानें एथें छेदिलें; यावरून ह्या ठिकाणास ‘ नासिक ’ हें नांव पडलें; अशी पौराणिक कथा आहे. पुराणांतरीं ह्यास पद्म-नगर, त्रिकंटक, जनस्थान अशीं हीं नांवें दिलेलीं आढळतात. मुसलमानी अमलांत ‘ गुलछनाबाद ’ हें नांव होतें. ]

हें शहर उत्तर अक्षांश २०°-२° व पूर्वरेखांश ७३°-४०° वर असून समुद्रसपाटीपासून ह्याची उंची १, ९६०. फूट आहे. ह्या शहराचें क्षेत्रफळ सुमारें ७ चौरस मैल व लोकसंख्या ३८, २३० आहे.

एथील हवापाणी उत्तम आहे. शहराचे आसपास व स्टेशन-जवळ ‘ आरोग्य भवनें ’ बांधलेलीं असून श्रीमंत व रोगी लोक हवा पालटण्यास त्यांत येऊन राहतात. शहराच्या आसपासच्या खेड्यांतून भाजीपाला, फळफळावळ, धान्य वगैरे बरेंच विकाव-यास येतें व एथून मुंबईसही रवाना होतें. चांदीच्या व तांबें पितळेच्या भांड्यांविषयीं प्रसिद्धी आहे. अलीकडे सोन्यारुप्याचे दागिनेही चांगले होऊं लागले आहेत. बाजार आठवड्यांतून दोन वेळां—बुधवारीं व शनिवारीं—भरतो.

४ छापखाने व ३ पिठाच्या गिरण्या आहेत. हें शहर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असल्यानें कलेक्टर, जज्ज वगैरे मुख्य ऑफिसर ह्यांच्या कचेऱ्या एथें आहेत. पुरुष, स्त्रिया व गुरें ह्यांचे दवाखाने, रहदारी बंगला, हेड्पोस्ट, सिटीपोस्ट, २ लायब्रऱ्या, १ आर्ट्स कॉलेज १ सरकारी हायस्कूल, १ मिशनऱ्यांची इंग्रजी शाळा, दहा पंधरा प्राथमिक शाळा, १ संस्कृत पाठशाळा, वेदशाळा, व्यापारी शाळा, इ० आहेत. पोलीस खात्याचें ट्रेनिंगस्कूल आहे.

हिंदुलोकांनीं पवित्र मानलेल्या गोदावरी नदीसंबंधानें हें क्षेत्र प्रसिद्ध आहे. सिंहस्थ व इतर पर्वण्या यांच्या वेळीं मोठी यात्रा भरत असते. ब्राह्मणांची वस्ती बरीच असून बहुतेक ब्राह्मण तीर्थोपाध्यायांचीं कामें करितात. " त्यांच्याजवळ यात्रेकरूंच्या मागील पिढ्यांची नांवनिशी सांपडते." एथील म्युनिसिपालिटी व्यवस्थित असून शहर-सुधारणा करीत आहे. नळानें पाणी आणण्याची सोय केलेली आहे. म्युनिसिपालिटीचा प्रेसिडेंट लोकनियुक्त असतो.

[ एथें प्रत्येक यात्रेकरूपासून चार आणे कर घेतात. ]

---

## ( अ ) शहरांतील प्रसिद्ध स्थळें.

( १ ) मुसलमानी अमलांतील जुनी गढी व शहराचा तट अगदीं पडला असून तटाचे भगूर दरवाजा, त्र्यंबक दरवाजा, आसराची वेस ह्या वेशी अद्यापि कायम आहेत. ह्या भागास 'जुनें नासिक ' असें ह्मणतात. जुम्मामशीद व पीरजायांचें थडगें ह्यांस सरकारी नेमणूक आहे. 'जोग' ह्यांच्या वाड्यांत 'मदिना ' एथून १६ व्या शतकांत आलेल्या शादकशाह हुसेनी ह्या साधूचें थडगें असून त्याचा मोठा उरूस भरत असतो.

( २ ) मराठी अमलांतील पेशव्यांनीं बांधलेला सरकारवाडा ह्याचें काम व चौथऱ्याचा गुळगुळीत दगड हें पाहण्यासारखें आहे. पेशव्यांनीं गंगेवरील कोट, घाट व पटांगण हीं बांधलीं आहेत. ह्या भागास ‘ नवें नासिक ’ ह्मणतात. नाव दरवाजा, दिल्ली दरवाजा, मल्हार दरवाजा इ० ह्याचे मुख्य रस्ते होत.

( ३ ) देवालयें—

( १ ) **सुंदर नारायण**—हे मंदिर जुन्या तऱ्हेच्या बांधणीचें असून नव्या पुलाजवळ आहे. ह्यास सरकारांतून ८०० रुपयांची नेमणूक आहे.

( २ ) **बालाजी**—हें प्रसिद्ध मंदिर १७७१ मध्यें बाप्पाजी बोवांनीं बांधिलें असून ह्यास १३ गांवें इनाम आहेत. संस्थानिकांनीं दिलेल्या नेमणुकाही आहेत. एकंदरींत हें संस्थान श्रीमंत आहे.

( ३ ) **गोरा राम**—हें मंदिर चांदोरीचे जहागिरदारांनीं बांधिलें.

( ४ ) **तिळभांडेश्वर**—हें त्र्यंबकराव पेठे ह्यांनीं इ० सन १७६३ त बांधिलें.

( ५ ) **यशवंतराव महाराजांची समाधि**—गंगेच्या घाटावर आहे.

( ६ ) **भद्रकाळी**—हें देवालय गणपतराव पटवर्धन ह्यांनीं इ० स० १७९० त बांधिलें.

ह्यांशिवाय लहानमोठीं देवळें अनेक आहेत.

## ( ब ) पंचवटी.

हें गांव गोदावरीच्या उत्तर तीरावर नासिकच्या समोरच असलेलें असल्यानें नासिकमध्येंच ह्याचा समावेश करितात.

[ राम वनवासांत असतां त्यांनीं कांहीं दिवस एथें घालविले, असें रामायणांत वर्णन आहे. ]

## पंचवटींतील प्रसिद्ध देवालयें.

१ **काळाराम**—हें मंदिर प्रेक्षणीय आहे. रंगराव ओढेकर ह्यांनीं इ० स० १७८२ त बांधिलें. २३ लक्ष रु० खर्च आला. ह्यांस लाविलेला दगड रामशेजच्या डोंगरांतून आणला होता. रामनवमीस मोठा उत्सव होतो व चैत्र शु० ११ स रथोत्सवाच्या वेळीं मोठी यात्रा भरते.

२ **कपालेश्वर**—हें शिवालय मोंगलांनीं उद्ध्वस्त केल्यावर इ० स० १७२८ त कोळी राजानें बांधविलें. व पुनः नुकतीच दुरुस्ती झाली आहे. ह्या देवळांत ' नंदी नाहीं ' हें विशेष आहे.

**रामेश्वर**—हें शिवालय नारोशंकर राजेबहाद्दर ह्यांनीं बांधिलें. ह्याचे पुढील दरवाज्यावर मोठी घंटा आहे. ही वसईहून आणिलेली असून इ० स० १७२१ त ओतलेली आहे. " हिचा आवाज ३ मैल ऐकूं जातो. "

यांशिवाय सीतागुंफा, मुठे ह्यांचें राममंदिर, धर्मशाळा वगैरे पाहण्यासारखीं अनेक स्थळें आहेत.

## ( क ) गंगेवरील देखावा.

गोदावरी ( गंगा ) नदीस दुतर्फा घाट, पात्रांत राम, लक्ष्मण, सीता, अहल्या इ० नांवांचीं कुंडें, कांठांवर सुंदर मंदिरें व भव्य धर्मशाळा, पटांगणावर बाजार व दुकानें, पात्रावरून जाण्याये-

ण्यांस सांडवे ( लहान पूल ), लोकांची रहदारी व स्नानें, धुणीं वगैरेची गर्दी, दोहों बाजूंनीं नासिक पंचवटींतील सुंदर घरें हा सर्व देखावा—विशेषेंकरून सकाळीं व संध्याकाळीं—फारच रमणीय असल्यानें युरोपियन प्रवासी लोक ह्याचे फोटो काढून घेत असतात.

( ड ) **तपोवन**—एथील दाटझाडी, तींतील देवळें व नदीचा सुंदर देखावा हें सर्व आल्हादकारक आहे.

( ई ) **म्हसरूळचीं लेणीं**—नासिकच्या उत्तरेस ४ मैलांवर म्हसरूळ एथें सीतासरोवर व डोंगरांतील जैनांचीं लेणीं प्रसिद्ध आहेत.

( फ ) **पांडव लेणीं** हीं नासिकच्या पश्चिमेस ६ मैलांवर 'आग्रारोड' रस्त्यानें जातांना लागतात. डोंगर ३,०००. फूट उंच आहे. ह्यांत २०–२५ गुहा असून त्यांत जिनाच्या मूर्ति, स्तूप व पाण्याचीं टांकीं आहेत. ह्यांत एक महादेवाचें स्थानही आहे. त्यावरून हिंदुलोक ह्यास 'पांडव लेणें' असें म्हणतात; व त्या मूर्तींना धर्म, भीम इ० नांवें देऊन भजतात. ह्या लेण्यांत पाली भाषेंत कोरलेले लेख अद्यापि स्पष्ट आहेत. अलीकडे सरकारनें ह्याची व्यवस्था उत्तम ठेविली आहे.

( ग ) **शरणपुरी**— एथें ख्रिश्चन लोकांची बरीच वस्ती असून त्यांच्या इंग्रजी व मराठी शाळा आहेत. एथील प्रार्थनामंदिर ( चर्च ) पाहाण्यासारखें आहे.

शहराच्या भोंवती बागबगीचे, मळे व त्यांतील बंगले ह्यांची गर्दी दिवसानुदिवस वाढत आहे.

# १५ नासिक जिल्ह्यांतील प्रसिद्ध स्थळें.

## तालुका—कळवण.

**कळवण**—( २,५६३.[1] ) गिरणानदीचे कांठीं असून तालुक्याचें ठिकाण आहे. हवा चांगली नाहीं. सॅनिटरीबोर्ड, दवाखाना व सबूपोस्ट आहे.

**बेज**—हें गिरणा नदीच्या कांठीं आहे. एथील शेतीला पाटाच्या पाण्याची सोय पहिल्या प्रतीची आहे. तांदूळ व गूळ प्रसिद्ध आहेत. ऊस गाळण्याचा मोठा कारखाना आहे.

**कनाशी**—खैरापासून कात व बाभळीपासून डिंक काढतात.

**हतगड**—एथील किल्ला पाहाण्यासारखा आहे.

**सप्तशृंग**—हें स्थान डोंगरावर असून एथील देवीचें पीठ सुप्रसिद्ध आहे. याशिवाय गडावर शिवालय, धर्मशाळा, तीर्थें व टांकीं आहेत. गडावरील सृष्टिसौंदर्य पाहण्यासारखें आहे. 'औषधि वनस्पति पुष्कळ आहेत अशी प्रसिद्धि आहे.' हें ठिकाण 'चांगल्या हवेचें' आहे असें समजतात. कळवणच्या बाजूनें गडावर जनावरें सुद्धां जातात. वणी ( दिंडोरी ) च्या बाजूनें वर चढण्यास पायऱ्या खोदल्या आहेत. ह्या पायऱ्या ८७६ असून कोनेर गिरमाजी नासिककर ह्यांनीं खोदविल्या आहेत. पायऱ्या उंच असल्यानें हा रस्ता फार कठीण वाटतो. चैत्रशुद्ध व आश्विन शुद्ध पौर्णिमेस गडावर मोठी यात्रा भरते. वर गवळी लोकांची वस्ती असल्यानें खवा वगैरे मिळतो.

**धोडप**—हा गांव डोंगरावर आहे. एथें थोरल्या माधवरावांनीं राघोबादादांचा पराभव करून त्यांस पकडिलें [ १७६८ ] एथें कळीचा चुना चांगला होतो.

---

१ कंसांतील आंकडे लोकसंख्येचे दर्शक आहेत.

यांशिवाय अभोणें, देवळें, वाखारी, ओतूर हीं मोठीं गांवें आहेत.

---

## तालुका–बागलाण.

**सटाणें**—( ३,७९७. ) हें आरम नदीचे कांठीं असून तालुक्याचें ठिकाण आहे. नोटिफाईड एरियाकमिटी, दवाखाना, सब्पोस्ट व रहदारी बंगला आहे. एथें देवमामलेदार यशवंतराव महाराज ह्यांची मार्गशीर्ष शु० १२ स यात्रा भरते.

**नामपूर**—( २, ६२७. ) हें मोसम नदीचे कांठीं असून रहदारी बंगला आहे. लुगडीं व आडकित्ते होतात.

**मुल्हेर**—मोसम नदीचे कांठीं असून उद्धव स्वामींची समाधि आहे. आश्विन शु० १५ स रास होतो, तेव्हां यात्रा भरते. दर १२ वर्षांनीं सिंहस्थांत गंगा येते असें सांगतात. हें क्षेत्र आहे. गांवाजवळच डोंगरावर किल्ला आहे.

**मुंजवाड**—आरम नदीच्या कांठीं आहे. पूर्वीं एथें कमोद तांदूळ उत्तम होत असत.

**अंतापूर**—पूर्वीं बांगड्यांचा कारखाना होता. दावलशाहा फकिराचा उरूस भरत असतो.

**साल्हेर**—हा किल्ला इतिहासप्रसिद्ध असून हल्लीं गायकवाड सरकारचे ताब्यांत आहे. ह्याची उंची कळसूबाईचे खालोखाल आहे.

**मांगी तुंगी**—हें जैनांचें प्रसिद्ध देवस्थान, खानदेश लगतच्या सरहद्दीवर आहे. एथील यात्रेची व्यवस्था खानदेशांतून होत असते.

यांशिवाय लोहोणेर, ठेंगोडें, वीरगांव, जायखेडें, डांगसौंदाणें, तिळवण हीं मोठीं गांवें आहेत.

---

१ कंसांतील आकडे लोकसंख्येचे दर्शक आहेत.

# तालुका–मालेगांव.

**मालेगांव ( २३, ५०५. )**—हें मोसम नदीच्या कांठीं असून जिल्ह्यांत दुसऱ्या प्रतीचें शहर आहे. एथें तालुक्याचें ठाणें, म्युनिसिपालिटी, लायब्ररी, दवाखाना, सबपोस्ट, तार ऑफिस, रहदारी बंगला, ३ मराठी शाळा, ३ उर्दू शाळा व २ इंग्रजी शाळा आहेत.

हवा उष्ण असून पाण्याचा नेहमीं तुटवडा असतो. मोमीन लोकांची वस्ती मोठी आहे. हे लोक लुगडीं व पागोटीं विणतात. एथील रंगारी लोक पासोड्या व जाजमें रंगवितात. १ छापखाना, २ कापसाच्या गिरण्या व ३ पिठाच्या गिरण्या आहेत.

पेशवाईंत प्रसिद्ध सरदार नारो शंकर राजेबहाद्दर ह्यांनीं इ० स० १७६५ त बांधलेला भुईकोट किल्ला नदीच्या कांठीं आहे. त्याच्याजवळच नदीस घाट व एक शिवालय आहे.

हा गांव मनमाड स्टेशनपासून २४ मैल असून तेथें जाण्यास हल्लीं मोटार गाड्या सुरू झाल्या आहेत.

**मालेगांव कँप ( लष्कर )**—हें मालेगांवाजवळच असून पूर्वीं एथें काळी फौज होती. सरकारनें एथील पोष्टांत वायुभारमापक यंत्र ठेविलें असून त्यावरून हवामानाचे आंकडे प्रसिद्ध होत असतात.

**कवळाणें**—हें खेडें आहे. एथें श्रीमंत सयाजीराव गायकवाड ह्यांचा जन्म झाला. त्यांचा वाडा व संग्रहालय आहे.

**वडनेर—खाकुर्डी**—हीं दोन गांवें मोसम नदीच्या कांठीं असून दोहों बाजूंस आहेत. दोन्ही गांवीं कमोद तांदूळ चांगले पिकतात.

**झोडगें ( २,०२३. )** कापसाची सरकी काढण्याची गिरणी आहे. व हेमाडपंती शिवालय आहे.

**चंदनपुरी** पौष शु० १५ स खंडोबाची यात्रा भरते.

**गाळणें**—किल्ला असून त्यांत इ० स० १८३४ पर्यंत होळकरांची टांकसाळ होती.

यांशिवाय पाटणें, ह्मसाडी, चिखलवहाळ, सौंदाणें, उमराणें, हीं मोठीं गांवें आहेत.

---

## ४ तालुका–नांदगांव.

**नांदगांव**—( ७,९४१. )—हें साखी नदीच्या कांठीं आहे. एथें तालुक्याचें ठाणें, म्युनिसिपालिटी, सब्पोष्ट, रेलवेचें मोठें स्टेशन, रहदारी बंगला व कापसाच्या दोन गिरण्या आहेत.

आंबराई पुष्कळ आहे. जैनांचें देवालय पाहण्यासारखें आहे.

**मनमाड** ( ७,७६०. )—पांझण नदीच्या कांठीं आहे. एथें जी० आय० पी० रेलवेचें जंक्शन आहे. नोटिफाईड एरियाकामिटी, दवाखाना, लायब्ररी, सब्पोष्ट, रहदारी बंगला व मिशनरी ह्यांची इंग्रजी शाळा आहे. एथील हवामान चांगलें आहे असें समजतात.

**नायडोंगरी**—कापसाची गिरणी असून लोण्याचा व्यापार चालतो.

**नस्तरपूर**—शनि–अमावास्येस[1] शनीची यात्रा भरत असते. खोजानें बांधलेला भुईकोट किल्ला व तट आहे.

यांशिवाय जातेगांव, मांडवड, बोलठाण हीं मोठीं गांवें आहेत.

---

## तालुका–चांदवड.

**चांदवड**—( ३,५८४ )—हें तालुक्याचें ठाणें आहे. दवाखाना, सब्पोस्ट व रहदारी बंगला आहे. हा गांव पूर्वीं होळकरांकडे होता. त्यांचा ‘ रंगमहाल ’ नांवाचा सुंदर वाडा आहे. रेणुका व कालिका देवींचीं देवालयें आहेत. नानावल्लीचा

---

१ शनिवारीं येणारी अमावास्या ती शनि–अमावास्या.

उरूस भरतो. चढाऊ जोडे, फण्या व लोखंडी पोहरे तयार होतात. अंजिरें व पेरू हीं फळें पिकतात. जवळच डोंगरी किल्ला असून पूर्वीं त्यांत होळकरांची टांकसाळ होती.

**वडनेर**—( ४,४४३ )—एथें भैरवाचें देऊळ असून चैत्र शु० १४ स यात्रा भरते. आंबराई मोठी आहे. विड्याचीं पानें होतात.

**धोडंबें**—हा गांव विंचूरकरांकडे जहागीर असून एथें विड्याचीं पानें चांगलीं होतात.

याशिवाय वडाळीभोई, दुगांव हीं मोठीं गांवें आहेत.

---

## तालुका-दिंडोरी.

**दिंडोरी**—( २,००३. ) हें धामण नदीच्या कांठीं असून तालुक्याचें ठाणें, दवाखाना, सबपोस्ट आणि सॅनिटरीबोर्ड हीं आहेत. हवा चांगलीशी नाहीं. आंबराई पुष्कळ आहे.

**वणी**—( २,०७० )—हें क्षेत्र आहे. जवळ दोन मैलांवर असलेल्या सप्तशृंग गडावर देवीचें स्थान आहे. गांवांतही देवी आहे ती, वरील देवीची प्रतिनिधि आहे, असें मानितात. पूर्वीं एथें महाल कचेरी होती. हवा चांगली नाहीं.

**करंजी ( वरखेडें )**—एथें दत्ताचें स्थान असून दशाहारांत उत्सव होत असतो.

रामशेजचा किल्ला, वाघाडचा तलाव, निलवंडीजवळील नदींतील ओघळी, हीं पाहण्यासारखीं स्थळें आहेत.

यांशिवाय जानोरी, मोहाडी, वरखेडें, खेडगांव हीं मोठीं गांवें आहेत.

---

## तालुका-पेठ.

**पेठ**—( ३,०२९. )—हा तालुक्याचा गांव आहे. दवाखाना, सब्पोस्ट व रहदारी बंगला आहे. डोंगरी लोकांकरितां एथलि शाळेला सरकारी खर्चानें बोर्डिंग जोडलेलें आहे. हवा वाईट, रेलवेपासून ४४ मैल दूर व डोंगराळ प्रदेश ह्यांमुळें एथील राहणें कष्टप्रद होतें.

[ हा तालुका पूर्वीं बेगमच्या ताब्यांत होता. तो इ० सन १८५८ सालीं खालसा करण्यांत येऊन बेगमच्या वंशजास नेमणूक करून दिली आहे. ]

**हारसूल** ( ८८३. )—रहदारी बंगला असून मुसलमानांची वस्ती बरीच आहे.

" या तालुक्यांतील बहुतेक गांवें अगदीं लहान लहान आहेत."

---

## तालुका-नासिक.

**नासिक**—ह्या शहराचें वर्णन आरंभीं स्वतंत्र दिलें आहे.

**त्र्यंबक**—( ४४२२. ) हें प्रसिद्ध क्षेत्र नासिकपासून १८ मैलांवर आहे. बारा ज्योतिर्लिंगांपैकीं 'त्र्यंबकेश्वर' हें प्रसिद्ध ज्योतिर्लिंग एथें आहे. गोदावरी ( गंगा ) नदीचा उगम एथून जवळच ब्रह्मगिरीच्या डोंगरावर आहे, त्यास 'गंगाद्वार' असें म्हणतात. ह्या शिवाय कुशावर्त, कनखल, बिल्व वगैरे तीर्थें आहेत. डोंगरावर 'नीलपर्वती' देवीचें स्थान आहे. निवृत्तिनाथ व परशुराम ह्यांचीं देवालयें आहेत. मुख्य देवालय त्र्यंबकेश्वराचें आहे. महाशिवरात्रीस त्र्यंबकेश्वराची व पौष वद्य ११ स निवृत्ति-नाथाची मोठी यात्रा भरत असते. ब्राह्मणवस्ती फार आहे. एथें म्युनिसिपालिटी, दवाखाना, पोस्ट, तार ऑफिस, लायब्ररी, संस्कृतशाळा व वेदशाळा हीं आहेत. भास्करगड म्हणून एक डोंगरी किल्ला आहे.

भगूर---हवापाणी चांगलें आहे. गोऱ्या फौजेची छावणी असून तीकरितां बंगले व बराकी बांधिल्या आहेत.

गंगापूर---एथें गोदावरीच्या पात्रांत धबधबा आहे. हा गांव नारायणराव पेशवे ह्यांची स्त्री गंगाबाई हिनें वसविला असें सांगतात.

म्हसरूळ---एथें जैन मंदिर, लेणीं व सीतासरोवर हीं पाहण्यासारखीं स्थळें आहेत.

यांशिवाय गिरनारें, ओढें, आडगांव हीं मध्यम प्रतीचीं गांवें आहेत.

---

## तालुका-निफाड.

निफाड---( ३,६१७. )-हें विनता नदीच्या कांठीं असून तालुक्याचा गांव आहे. रेलवे स्टेशन दोन मैल आहे. दवाखाना, सबपोस्ट व सॅनिटरीबोर्ड आहे.

पिंपळगांवबसवंत ( २,६५६. )---पाराशरी नदीच्या कांठीं असून एथें मुनसफकोर्ट, दवाखाना, रहदारी बंगला व सबपोस्ट आहे.

ओझर ( ३,२८४. ) बाणगंगेच्या कांठीं आहे. तांबें व पितळ ह्यांचीं भांडीं होतात, म्हणून ह्या गांवास ‘ तांबटाचें ओझर ’ असें म्हणतात. आडकित्ते व वस्तरे होतात. रहदारी बंगला आहे.

लासलगांव ( १,६३६. )---रेलवे स्टेशन असून धान्याच्या व्यापाराची मोठी पेठ आहे. पोस्ट ऑफिस व भुईकोट किल्ला आहे.

सायखेडें ( १,३२६. )-गोदावरीचे कांठीं आहे. विंचूरकरांचा जहागिरी गांव आहे. कुलपें तयार होतात. ही मोठी व्यापारी पेठ होती, पण अलीकडे नांदूरमध्यमेश्वर एथील बंधाऱ्यामुळें ‘ गोदावरी ’ च्या पाण्याचा तुंबारा आल्यानें लोकांचा दळणवळणाचा मार्ग बंद झाला म्हणून व्यापार खालावला आहे.

**विंचूर ( ३,५९५. )**—हा जहागिरी गांव असून लासलगांव स्टेशनापासून ३ मैल आहे. हवापाणी उत्तम असून संस्थानिकांचा वाडा पाहण्यासारखा आहे.

**चांदोरी (४,०४७.)**—गोदावरीच्या कांठीं असून हिंगणे ह्यांचा जहागिरी गांव आहे. बागाईत पुष्कळ आहे.

**सुकेणें ( १,७१३. )**—गांव जहागीर असून बागयती आहे.

---

## तालुका—येवलें.

**येवलें ( १३,९११. )**—हें जिल्ह्यांत तिसऱ्या प्रतीचें शहर आहे. व्यापाराची मोठी प्रसिद्ध पेठ असून व्यापारी लोक सधन आहेत. तालुक्याचें ठाणें, रेलवे स्टेशन, सब्‌पोष्ट, दवाखाना, रहदारी बंगला, १ इंग्रजी व १०–१२ इतर शाळा आहेत. लायब्ररी आहे. पूर्वी पाण्याचा तुटवडा होता; परंतु अलीकडे नळानें पाणी आणून सोय केलेली आहे.

जरीचें व रेशमी कापड चांगलें तयार होतें. एथें पटणी, गुजर, जैन लोकांची वस्ती बरीच आहे. जैनांचें मंदिरही चांगलें आहे.

हें मूळचें खेडें होतें, परंतु रघूजी नाईक पाटील ह्यांनीं मुद्दाम कारागीर आणवून पेठ बनविली.

**अंदरसूल ( ३,५९५. )**—शिंदे सरकारचे जांवई शितोळे ह्यांस हा गांव इनाम दिलेला आहे. एथें विड्याचीं पानें चांगलीं होतात.

**आणकई**—डोंगरी किल्ला असून वर अगस्तितीर्थ आहे.

**नागडें**—सुती व रेशमी लुगडीं तयार होतात.

यांशिवाय सांवरगांव, नगरसूल, राजापूर हीं मोठीं गांवें आहेत.

---

## तालुका-सिन्नर.

**सिन्नर** ( ७,२११. )—हें नासिकरोड स्टेशनापासून १३ मैल आहे. तालुक्याचा गांव असून म्युनिसिपालिटी, दवाखाना, सबूपोस्ट, तार ऑफिस, लायब्ररी, १ मिशनऱ्यांची इंग्रजी शाळा व ४ इतर शाळा आहेत. विड्याचीं पानें व द्राक्षें होतात. बागायती गांव असून हवापाणी चांगलें आहे. हेमाडपंती शिव-पंचायतनाचें देवालय असून देशमुखांच्या वाड्याचा भव्य कोट फक्त शिलक आहे.

**डुबेरें** ( १,७९७. )—पहिल्या पेशव्यांची सासुरवाडी एथलीच होती. बरवे ह्यांची एक बाग एथें असून तींत नारळ, फणस, काफी, मिरीं, पिंपळी इ० झाडें आहेत.

**वावी**—धान्याचा मोठा बाजार भरतो. साताऱच्या भोंसले राजाचा वंश एथें असून ‘ पाटिलकी ’ त्यांची आहे.

**देवपूर**—बाबा भागवत ह्या साधूंची समाधि असून दरसाल यात्रा भरते. ह्या गांवास राणेखांचें देवपूर म्हणतात. त्यांची बाराद्वारी इमारत पाहण्यासारखी आहे.

यांशिवाय ठाणगांव, दापूर, वडांगळी हीं मोठीं गांवें आहेत.

---

## तालुका-इगतपुरी.

**इगतपुरी** ( ९,९२१. )—तालुक्याचें ठिकाण, म्युनिसि-पालिटी, रेलवे स्टेशन, दवाखाना, सबूपोस्ट व ३-४ शाळा आहेत. युरोपियन लोकांची बरीच वस्ती असून त्यांची लायब्ररी व इंग्रजी शाळा आहे. पाऊस सुमारें १००-१२५ इंच पडतो.

**घोटी** ( २,६७६. )—तांदुळाचा मोठा बाजार भरतो.

**कावनई**—सन १८६१ पर्यंत तालुक्याचें ठाणें होतें. कपिलधारा तीर्थ आहे.

**टाकेद्**—सर्वतीर्थ असून महाशिवरात्रीस यात्रा भरते.
**खेडगांव**—शुक्रतीर्थ असून भैरवाची यात्रा भरते.
**भावली**—एथें धनुष्यतीर्थांतून दारणा नदी उगम पावते.

---

## प्रसिद्ध स्थळांचें वर्गीकरण.

### ( परिशिष्ट. )

एक स्थळ अनेक कारणांनीं प्रसिद्ध असतें, ही माहिती मागें आलीच आहे. आतां एकच कारण अनेक स्थळांना कसें लागू पडतें, तें ह्या वर्गीकरणांत दाखविलें आहे.

### इतिहासप्रसिद्ध गांवें.

**नासिक**—मोंगलाईंत सुभ्याचें ठाणें होतें. पेशवे मधून मधून रहात असत.

**साल्हेर**—ह्या किल्ल्यावर मोंगल व मराठे ह्यांची मोठी लढाई झाली ( १६७२ ).

**चांदवड**—मोंगलाईंत व्यापारी पेठ असून होळकरांची टांकसाळ होती.

**धोडप**—थोरले माधवराव व राघोबादादा ह्यांमध्यें लढाई झाली [ १७६८ ].

**मालेगांव**—नारोशंकर राजेबहादूर ह्यांचें ठिकाण.

**कवळाणें**—श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड ह्यांची जन्मभूमि.

**विंचूर**—‘ विठ्ठल शिवदेव दाणी, ’ पेशवाईंतील सुप्रसिद्ध सरदार, ह्यांच्या संस्थानचें मुख्य ठिकाण.

**वावी**—एथें सातारच्या भोंसले राजांचा वंश आहे.

**दिंडोरी**—हा तालुका थोरल्या माधवरावांनीं, आई गोपिकाबाई हिच्या खाजगत खर्चास दिला होता.

**पेठ**—हा तालुका बेगमकडे होता, तो सन १८५८ त खालसा झाला.

## २ तीर्थांचीं व क्षेत्रांचीं गांवें.

**नासिक, पंचवटी**—गोदावरीच्या कांठचीं क्षेत्रें असून पौराणिक कालापासून प्रसिद्ध आहेत.

**त्र्यंबक**—प्रसिद्ध ज्योतिर्लिंग आहे.

**सप्तशृंग**—एथील देवीचें स्थान सर्वविश्रुत आहे.

**मुल्हेर**—उद्धव स्वामींची समाधि आहे.

---

## ३ यात्रांचीं गांवें.

[ क्षेत्रांच्या गांवीं यात्रा भरतातच; त्यांशिवाय यात्रांचीं गांवें आहेत. ]

**सटाणें**—देव मामलेदार ह्यांची यात्रा भरते.

**देवपूर**—बाबा भागवत ह्या साधूची यात्रा भरते.

**चांदवड**—नानावल्लीचा उरूस भरतो.

**नस्तरपूर**—शनि-अमावास्येस यात्रा भरते.

## ४ हवा, पाऊस, पीक व इतर उत्पन्न ह्यांविषयीं प्रसिद्ध स्थळें.

**पेठ, कळवण, दिंडोरी, इगतपुरी**—ह्या तालुक्यांची हवा वाईट आहे असें समजतात.

**निफाड, सिन्नर, सटाणें**—हे तालुके उत्तम हवेचे आहेत.

**इगतपुरी, पेठ**—ह्या ठिकाणीं पाऊस फार पडतो.

**निफाड, नासिक, सिन्नर** ह्या तालुक्यांत बागाईत विशेष आहे.

**घोटी, ठाणगांव व वणी**—हीं गांवें तांदुळाविषयीं प्रसिद्ध आहेत.

**सिन्नर वडनेर, धोडंबें, अंदरसूल**—एथें विड्याचीं पानें होतात.

**पेठ तालुका**--ह्यांत सागाचें लाकूड व जंगली उत्पन्न चांगलें होतें.

## ५ कारखाने व उद्योगधंदे ह्यांविषयीं प्रसिद्ध गांवें.

**मालेगांव, नांदगांव, मनमाड, झोडगें, नायडोंगरी, मालेगांवकन्नड**-ह्या गांवीं कापसाच्या गिरण्या आहेत.

**नासिक, ओझर**--एथें भांडीं चांगलीं होतात.

**येवलें, मालेगांव, सिन्नर**-एथें लुगडीं चांगलीं होतात.

**सायखेडें, ओझर**--आडाकित्ते व कुलुपें होतात.

**व्यापारी पेठा**--येवलें, मालेगांव, नासिक, नांदगांव, लासलगांव, घोटी.

## ६ मोठे बाजार.

मालेगांव, नांदगांव, बोलठाण, येवलें, लासलगांव, नासिक, वावी, घोटी, वणी, सिन्नर, भगूर, कनाशी, बाऱ्हें ह्या गांवीं भरतात.

## ७ सब्-पोष्टाचीं गांवें.

**तालुक्याच्या गांवांशिवाय**--मालेगांव-कँप, लासलगांव, पिंपळगांवबसवंत, मनमाड, नासिकरोड, त्र्यंबक, घोटी व विंचूर.

## ८ तार ऑफिसें.

**स्टेशनाच्या गांवांशिवाय**--मालेगांव, मालेगांव-कँप, येवलें, मनमाड, लासलगांव, सिन्नर, देवळाली, नासिक, त्र्यंबक, नांदगांव, निफाड एथील पोस्टांस तार ऑफिसें जोडलेलीं आहेत.

**टीप**--स्टेशनांचीं गांवें, रस्त्याच्या माहितींत क्रमानें दिलेलींच आहेत.

## ९ कोर्टाचीं गांवें.

नासिक, पिंपळगांवबसवंत, सिन्नर, सटाणें, मालेगांव व येवलें हीं होत.

---

## १० रहदारी बंगले.

सटाणें, ठेंगोडें, नामपूर ( बागलाण ); चांदवड, मनमाड, चाचडगांव ( दिंडोरी ); इगतपुरी, वाढिवरें; नांदुरी, चणकापूर ( कळवण ); मालेगांव, चिखलवहाळ, सौंदाणें, जळगांव, नांदगांव; नासिक; पिंपळगांवबसवंत, लासलगांव, ओझर; पेठ, हरसूल; सावरगांव ( येवलें ) ह्या गांवीं रहदारी बंगले आहेत.

---

## ११ सात इयत्ता शिकविणाऱ्या शाळांचीं गांवें.

कळवण, देवळें; सटाणें, नामपूर, लोहोणेर, जायखेडें; **मालेगांव**, झोडगें, चिखलवहाळ, खाकुरडी, सौंदाणें, उमराणें, दाभाडी; **नांदगांव**, नायडोंगरी; **चांदवड**, वडनेर, धोडंबें; **दिंडोरी**, वणी, मोहाडी, खेडगांव; **पेठ**; **नासिक**, त्र्यंबक; **निफाड**, चांदोरी, सायखेडें, ओझर, विंचूर, पिंपळगांवबसवंत; **येवलें**, अंदरसूल; **सिन्नर**, देवपूर डुबेरें, वडांगळी; **इगतपुरी**.

## १२ इंग्रजी शाळांचीं गांवें.

नासिक, येवलें, मालेगांव, सटाणें, सिन्नर, इगतपुरी व मनमाड.

## १३ लायब्ररी असलेलीं गांवें.

नासिक, मालेगांव, येवलें, सिन्नर, मनमाड व इगतपुरी.

| तालुका. | | क्षेत्रफळ. चौ० मै० | एकूण. | खालसा | उजाड.* | इनामी. | लोकसंख्या. | द० चौ० मै० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | कळवण. | ४९४ | १९३ | १७० | ० | २३ | ५८,६५६ | ११ |
| २ | बागलाण | ६०१ | १६२ | १४१ | ० | २१ | ६४,७९८ | १० |
| ३ | मालेगांव. | ७७७ | १५३ | १४५ | ० | ८ | १,००,८८८ | १३ |
| ४ | नांदगांव | ४३५ | ९३ | ८६ | ५* | ५ | ४८,५४१ | ११ |
| ५ | चांदवड. | ३८५ | १०९ | १०२ | ० | ७ | ४७,१६१ | १२ |
| ६ | दिंडोरी. | ५३२ | १२८ | १२१ | ० | ७ | ६३,८०७ | १२ |
| ७ | पेठ. | ४३२ | २४५ | २२६ | ९* | १९ | ५३,४२८ | १२ |
| ८ | नासिक. | ४७० | १३७ | ११० | ० | २७ | १,३४,६२९ | २८ |
| ९ | निफाड | ४१२ | १२२ | १०७ | ० | १५ | ७६,८१० | १८ |
| १० | येवलें. | ४१० | १२० | १०१ | ० | १९ | ४८,४०८ | ११ |
| ११ | सिन्नर | ५१४ | १०३ | ९८ | ० | ५ | ५९,२७५ | ११ |
| १२ | इगतपुरी | ३९४ | १३० | १२३ | ० | ७ | ७६,०७५ | १९ |
| एकूण. | | ५८५६ | १६९५ | १५३२ | १४* | १६३ | ८,३२,५७६ | १७ ÷१ |
| * एकूण पैकीं. जिल्ह्याचें सरासरी प्रमाण. | | | | | | | | १४ |